


# दिग्विजय

च्या जुलाई ते नोव्हेम्बर २००८ पर्यंतच्या अंकामध्ये प्रकाशित झालेले व होणारे लेख साभार घेऊन श्री भारतवर्षीय दिगम्बर जैन श्रुत पुत्र पीठ द्वारे प्रकाशित

# नवरात्री विशेषांक (मराठी)

## अपरनाम - विजयादशमी पर्वावर दिग्विजयचा दिग्विजयी उपक्रम

यज्ञोपवीत व शासन देवतांच्या आगमोक्त सिद्धि नंतर चे हे विशेषांक नवरात्री पर्वाला जैनांचे पर्व सिद्ध करणारी




**दिग्विजय**

ची ही अद्वितीय प्रस्तुति आहे, यज्ञोपवीत व शासनदेवतांच्या मान्यता व उपासना प्रकरणात तर शास्त्री व विद्वत् परिषदांनी आपले गुडघे टेकून दिले आहेत, यावेळी शास्त्री व विद्वत् परिषदांद्वारे केलेल्या आहानाच्या प्रत्युत्तरात आमच्या कडून आहान केले जात आहे.

## एकूण विषय तीन :

1. काय नवरात्री जैनेतरांकडून जैनांकडे आलेले मिथ्यात्व आहे ?
2. काय नवरात्री जैनांचे उत्सव नाही ?
3. काय पुरुष पद्मावती मातेचे शृंगार व अभिषेकादि करू शकत नाहीत ?

अनुवादिका : आर्यिका चिन्मय श्री ✱ वरिष्ठ संपादक : भरत काला (मुंबई)

लेखक / मुख्य संपादक : हेमन्त काला (इन्दौर)

३४. श्री मनीष मोदी 'एडवोकेट'
हिन्दी ग्रन्थ कार्यालय
6 हीराबाग, सी.पी. टैंक
मुम्बई-400004 (महा.)

प्रिन्टेड
मेटर



प्रकाशक/प्रेषक : श्री भारतवर्षीय दिगम्बर जैन श्रुत पुत्र पीठ
438, चंद्रिका, कालानी नगर, विमान पत्तन मार्ग, इन्दौर (म.प्र.) पिन : 452005
दूरभाष : 0731-2629911/2620661(फेक्स) / मो. 9425075774

# आचार्य ज्ञानसागरजी द्वारे केले गेलेले कुळ देवता विधान

जसे की पान क्र. 9 वर सांगितले होते की आचार्य ज्ञानसागरजी कृत श्री जयोदय महाकाव्याची फक्त आचार्य विद्यासागरजी महाराजांच्या संघातच नाही, तर शास्त्री व विद्वत् परिषदांच्या सदस्यांमध्ये सुद्धा अद्भूत मान्यता आहे. ज्याची सिद्धि दिनांक 29.09.1995 ते 03.10.1995 पर्यन्तच्या मदनगंज किशनगड (राज.) मध्ये आयोजित विद्वत् संगोष्टी द्वारे होते. दिनांक 29.09.1995 ते 03.10.1995 पर्यन्त मदनगंज किशनगड (राज.) मध्ये याच ग्रन्थराजाच्या सम्मानात विद्वत् संगोष्टी ठेवली गेली होती, ज्यांत प्रथम दर्जाच्या 54 विद्वानांद्वारे केलेल्या सखोल अध्ययनानंतर याला विश्वातील महानतम ग्रन्थांपैकी एक घोषित केले गेले होते.

कारण की या ग्रन्थाला भावुकतेने भरलेल्या लोकांनी नाही, तर बुद्धिजीविंनी मुनिपुंगव सुधासागरजींच्या अनुमोदनेपूर्वक जैन दर्शन, न्याय व साहित्याच्या पूर्वापरादि गुण–दोषांचे विचार करून याला विश्वातील महान ग्रंथ घोषित केले होते, त्यामुळे निःशंकपणे म्हटले जाऊ शकते की फक्त या विद्वानांसाठीच नाही, तर स्वतः मुनिपुंगव सुधासागरजी व आचार्य श्रींच्या संघस्थ बाकी सर्व मुनिराजांसाठी सुद्धा या ग्रंथामध्ये केलेल्या प्ररुपणा फक्त आदरणीय व माननीयच नाही, तर सर्वांग व सर्वप्रकारे स्वीकरणीय ही असतील, जर नसतील तर म्हटले जाईल की उपस्थित विद्वानांनी मुनिपुंगवजींना प्रसन्न करण्याच्या प्रयत्नामध्ये आचार्य ज्ञानसागरजींचे गुणानुवाद केले व मुनिपुंगवजींनी आपल्या गुरुंना प्रसन्न करण्यासाठी त्यांच्या गुरुंचे फक्त गुणानुवादच केले असे नाही, तर चातुर्मास संपन्न करविणाऱ्या श्रेष्ठिंना गुणानुवाद सभेचे आयोजन करण्यासाठी प्रेरित ही केले. व फक्त गुणानुवाद सभेसाठीच प्रेरित केले असे ही नाही, तर सत्य हे ही आहे की त्यांनी अनेक शोधार्थ्यांना या ग्रंथराज व आचार्य ज्ञानसागरजींच्या व्यक्तित्वावर शोध कार्य करण्याची प्रेरणा सुद्धा दिली, व अनेकांनी या ग्रंथराजावर पी.एच.डी. करून डॉक्टरेट मिळविले ही.

निश्चितच उपस्थित विद्वानांनी विद्वानांचे मोठेपण ठेवण्यासाठी मुनिपुंगवजींची खुशामत केली नाही व मुनिपुंगवजींनी ही आपल्या गुरुंना प्रसन्न करण्यासाठी दादागुरु आचार्य ज्ञानसागरजींची गुणानुवाद गोष्टी ठेवली वा ठेवायला लावली नसणार, एवढेच काय, तर या ग्रंथराजावर केले गेलेले डॉक्टरेट सुद्धा विश्वविद्यालयाशी छळ वा कपट करून प्राप्त केलेले डॉक्टरेट मुळीच नसणार, त्यामुळे निःशंकपणे म्हटले जाऊ शकते की श्री जयोदय महाकाव्यातील प्रत्येक अक्षर या विद्वानांसाठी, आचार्यश्रींच्या संघातील सर्व साधुंसाठी व शोधकर्त्यांसाठी साक्षात् जिनेन्द्र भगवंताच्या वाणी सदृश्य असेल.

कारण की श्री जयोदय महाकाव्याशिवाय आचार्य ज्ञानसागरजी

महाराजांद्वारे रचित अन्य ग्रंथांवर मुनिपुंगवजी सहित 54 विद्वज्जणांचे स्पष्ट मत उपलब्ध असून देखील ते अनुपलब्धवत च आहे, त्यामुळे त्यांच्या अन्य ग्रंथांबद्दल काहीही न बोलता, आपल्या चित्तात या सत्याला स्थापित करून विषयाला पुढे गति देतो की श्री जयोदय महाकाव्यातील प्रत्येक अक्षर या विद्वान, मुनिपुंगवजी व आचार्य श्री विद्यासागरजींसाठी जिनेन्द्र देवाच्या वाणी सारखेच निर्मळ आहे, म्हणून या ग्रंथामध्ये केलेल्या प्ररुपणांना कुठल्याच प्रकारे बाधित ही केले जाऊ शकत नाही व अन्य मतावलम्बिंपासुन प्रभावित ही म्हटले जाऊ शकत नाही.

याच श्री जयोदय महाकाव्यजीच्या बाराव्या सर्गामध्ये जयकुमार व सुलोचना च्या विवाहाचे वर्णन आहे. ठीक विवाहाच्या क्षणी अर्थात् जयकुमारच्या गळ्यात वरमाळ टाकण्यापूर्वी स्त्रियोचित भयाने भयभीत होऊन सुलोचना आपल्या मंगलासाठी जिनेन्द्र भगवंतासह विश्वातील अन्य समस्त मंगलकारी महानुभावांचे स्मरण करते. या मंगलकारी महानुभावांमध्ये ज्यांना–ज्यांना ती आपल्यासाठी मंगलकारी होण्याचे निवेदन करते, त्यांमध्ये कुळदेवताही आहेत, पहा श्लोक क्र. 8 :

दृशि वः शिवमस्तु हे सुरेशा मृदुवेशा कुलदेवतापि मे सा।
शिवमाशिषि वर्तते च येषां गुरवः श्रीपुरवर्तिनोपि शेषाः।।

स्वतः आचार्य ज्ञानसागरजी द्वारे लिहिलेली संस्कृत टीका : हे सुरेशा सुपर्वाणः, वो युष्माकं दृशि दृष्टौ शिवमस्तु, सा मृदुवेषा प्रसन्न वेशवती कुलदेवतापि शिवमस्तु कल्याणकारि भवतु।..........

या श्लोकांत सुलोचनाने कुळदेवतांना आपल्या स्वतः साठी मंगलकारी होण्याचे निवेदन केले आहे. याठिकाणी प्रश्न आहे की काय सुलोचना, जिच्या सम्यक्त्वाबद्दल आचार्य ज्ञानसागरजी महाराज निःशंक आहेत, जिनेन्द्र भगवंताशिवाय, दुसऱ्या कोणाजवळ ही, मग ते कुळदेवता च का नसो, आपल्यासाठी मंगलकामना करू शकते ?

या प्रश्नाचे उत्तर आचार्य ज्ञानसागरजी महाराजांनी दुसऱ्या अध्यायात दिले आहे. दुसऱ्या सर्गाच्या 39 क्र. च्या श्लोकांत ते म्हणतात की :

आत्रिकेष्टहतिहापनोद्यतः साधयेत् स्वकुलदेवताः।
हेलया हि बलवीर्यमेदुरः साधयत्यनरगोचरं सुरः।।

स्वोपज्ञ टीका : आत्रिकेति। अतः भवनमात्रिकम् अत्रिकंच तदिष्टं तस्य हतेर्हापने उद्यतो लौकिकेप्सितक्षतिनाशतत्परः पुरुषः स्वकुलदैवतादि साधयेद् उपासनादिभिः प्रसादयेदित्यर्थः। हि यस्माद् बलंच वीर्यंच बलवीर्ये ताभ्यां मेदुरः पुष्टः सुरो देवो हेलयाऽनायासेन, नरणां गोचरं न भवतीति अनरगोचरमतिमानुषं कार्य साधयति सम्पादयतीत्यर्थः।

अर्थ : लौकिक कार्याच्या निर्विघ्न सम्पन्नतेची इच्छा असणाऱ्या

गृहस्थाने आपल्या कुळदेवता आदिंना उपासना–साधने द्वारे प्रसन्न केले पाहिजे, कारण की देवलोक मनुष्यांपेक्षा अधिक बल, वीर्य सम्पन्न असतात, जे कार्य मनुष्य करू शकत नाही त्याला ते लीलावश करून दाखवितात.

निश्चितच याठिकाणी पाठकांना वरील प्रश्नाचे उत्तर स्वतः आचार्य ज्ञानसागरजी महाराजांच्या शब्दांत मिळालेच असेल की सम्यग्दृष्टि सुलोचना कुळ देवतांचे स्मरण व त्यांची उपासना करु शकते. करु शकत नाही, असे नाही अर्थात् आचार्य ज्ञानसागरजी महाराजांच्या अपेक्षेने कुळदेवतांच्या उपासनेने सम्यग्दर्शन सुटणे तर दूर, मलिन ही होत नाही. कारण की आचार्य श्रीं चे उपर्युक्त उपदेश आपल्यातच एवढे काही सांगण्याचे सामर्थ्य ठेवते की त्यावर आपल्या तर्फे कुठल्याही प्रकारची टीका करणे वाचाळतेशिवाय दूसरे काहीच म्हटले जाणार नाही, म्हणून याविषयी आम्ही मौन धारण करतो.

जसे की पूर्वी सिद्ध केले गेले आहे, त्यानुसार आचार्य श्री ज्ञानसागरजी महाराजांच्या जयोदय महाकाव्यामध्ये लिहिलेले वचन जरी स्वतः च प्रमाण आहेत, ते अन्य कोणत्याही प्रमाणाचे मोताद नाही, तरीही बळवानांना अजून अधिक बळ देणारे विधान लक्षात ठेवून त्यांच्या पक्षात विद्वज्जणांमध्ये महान ख्याति प्राप्त धनंजय कविकृत द्विसंधान महाकाव्याच्या तिसऱ्या सर्गाच्या श्लोक क्र. 26 चे उल्लेख करीत आहोत.

फक्त अर्थ : महाराज दशरथ अथवा पाण्डु यांनी आपल्या कुळ देवतांचे विधिपूर्वक पूजन करून राजपुत्राच्या ब्रह्मचर्य आश्रमाच्या समाप्तिचे संस्कार केले होते. त्यानंतर आपल्या समान आचार, विचार, शिक्षा, दीक्षा व कुलीनतेने युक्त स्थानी त्यांचे विवाह केले.

याठिकाणी पाठकांना आठवून देतो की जैन दर्शन, न्याय व साहित्याचे अद्वितीय ग्रंथ द्विसंधान महाकाव्य, त्या ग्रंथराजांपैकी एक आहे ज्याला सामान्य विद्वान् तर वाचण्याचे विचार ही करू शकत नाहीत, कारण की स्याद्वाद कौशल्याच्या अभावात त्याला समजणे तर दूर, वाचणे ही दुष्कर कार्य आहे. याठिकाणी श्री अष्टसहस्री ग्रंथराजाचे न्याय स्मरण करण्यासारखे आहे. श्री अष्टसहस्री चे रचयिता आचार्य विद्यानंदजी स्वतः लिहितात की त्यांनी लिहिलेली अष्टसहस्री, अष्टसहस्री नाही, कष्टसहस्री आहे. हेच विधान श्री द्विसंधान महाकाव्यामध्ये ही स्मरण करण्यासारखे आहे.

जसे सामान्य विद्वान या ग्रंथराजांना वाचण्याचे विचार सुद्धा करू शकत नाहीत, तसेच सामान्य श्रावक/स्वाध्याय प्रेमिंसाठी यांचे नाव ऐकणे देखील महान पुण्याचे उदय समजले जाते, जसे की आचार्य ज्ञानसागरजी महाराजांचे जयोदय महाकाव्य. आचार्य श्री विद्यासागरजी महाराजां द्वारे वाचण्याची प्रेरणा देण्याच्या उद्देशाने अनेक वेळा उल्लेख

शेष कवर पृष्ठ क्रमांक 5 पर

आर्ष मार्ग का शंखनाद  

# दिग्विजय

## जुलाई ते ऑगस्ट २००८ पर्यंतच्या अंकांतून साभार घेऊन प्रकाशित

## विजयादशमी पर्वावर दिग्विजयचा दिग्विजयी उपक्रम

# नवरात्री विशेषांक (मराठी)

यज्ञोपवीत व शासन देवतांच्या आगमोक्त सिद्धिनंतर नवरात्रीला जैनांचे पर्व सिद्ध करणारा हा विशेषांक आर्षमार्ग का शंखनाद दिग्विजयची अप्रतिम प्रस्तुति आहे. यज्ञोपवीत व शासनदेवतांच्या मान्यता व उपासना प्रकरणात शास्त्री व विद्वत् परिषदांनी तर आप आपले गुडघे टेकले आहेत, या वेळी शास्त्री व विद्वत् परिषदां द्वारे दिलेले आह्वानाच्या प्रत्युत्तरात आमच्या कडून दिला जानारा हा आह्वान नवरात्री महोत्सवा बद्दल आहे.

## एकूण विषय तीन

1. काय नवरात्री जैनेतरांकडून जैनांकडे आलेले मिथ्यात्व आहे ?
2. काय नवरात्री जैनांचे उत्सव नाही ?
3. काय पुरुष माँ पद्माचे अभिषेक व श्रृंगारादि करु शकत नाहीत ?

**अनुवादिका : आर्यिका चिन्मय श्री**

**वरिष्ठ संपादक : भरत काला (मुंबई)**

**लेखक व मुख्य संपादक : हेमन्त काला**

**सह संपादक :**

**अण्णासाहेब खोत, विपिन भाई कोटडिया, धनपाल म. हाबळे, सुभाष देवेन्द्र पुत्र शेट्टी**

**प्रकाशक :- श्री भारतवर्षीय दिगम्बर जैन श्रुत पुत्र पीठ**

438, चंद्रिका, कालानी नगर, विमान पत्तन मार्ग, इन्दौर (म.प्र.) पिन : 45205

दूरभाष : 0731-2629911 / मो. 9425075774

प्रथम आवृत्ति / 11000 प्रत / मूल्य : 10 रुपये फकत

प्रकाशन तिथी, माह व वर्ष – सपटेम्बर 2008 अनन्त चतुर्दशी

मुद्रक : अथर्व पेकेजिंग प्रा. लिमिटेड, ३२, सेक्टर ए, इन्डस्ट्रीयल एरिया, सांवेर रोड, इन्दौर (म.प्र.)

या पुस्तका बाबत सर्व न्यायालयीन विवादांसाठी न्यायालय इन्दौर (म.प्र.) राहील.

# श्री भारतवर्षीय दिगम्बर जैन श्रुत पुत्र पीठेच्या

## तत्त्वावधानात श्रुत पुत्र पीठ द्वारे संचालित
## गुरुकुल मध्ये अध्ययन हेतु प्रथम छात्रा अर्थाने प्रवेश प्राप्त

## गणाधिपति गणधराचार्य कुंथुसागरजी महाराजांची
आज्ञानुवर्तीनी शिष्या
१०५ आर्यिका चिन्मय श्री माताजीचे
दिनांक २०.०७.२००८ ला क्षुल्लिका श्रद्धाश्री माताजी सह भव्य
चातुर्मास कलश स्थापन महोत्सव संपन्न झाले.

: स्थान :
श्री मोदीजी की नसिया, बडा गणपति के पास, मल्हारगंज, इन्दौर (म.प्र.)
: निवेदक व चातुर्मास व्यवस्थापक :
श्री दि. जैन पंच लश्करी गोठ ट्रस्ट मंदिर रामाशाह

**दैनिकी / दैनंदिनी स्वाध्याय:**
1. श्री देवागमस्तोत्रजी (मूल मात्र)
2. श्री तत्त्वार्थसूत्रजी (श्री सवार्थसिद्धिजी व श्री राजवार्तिकजीचे यथाशक्य अवलंबन पूर्वक)
3. वृहद् अनुवादचंद्रिका (श्री चक्रधर नौटियाल 'हंस' शास्त्री रचित)
4. श्री प्रवचनसारजी (कानजी मतांचे दोष समझुन घेण्यासाठी त्यांच्या द्वारे मान्य श्रीमद् अमृतचंद्राचार्यजींची टीकेचे अवलंबन सह)
5. श्री रत्नकरण्डश्रावकाचारजी (न्यायग्रंथांच्या आश्रयाने सूत्रसम अध्ययन)

**निवेदन :** मागील वर्षी त्यागी-व्रतींच्या समुचित व्यवस्थेच्या अभावामुळे आम्हीं मुनिराज, आर्यिका, ऐलक, क्षुल्लकादिंची व्यवस्था करु शकलो नव्हतो, कारण की या वर्षी ती व्यवस्था करुन घेतली आहे, म्हणून अध्ययनाच्या इच्छुक मुनिराज आदिंनी या सूचना पत्रालाच कृपया श्री फळ अर्पण समजावे.

निवेदक : हेमन्त काला (अधिष्ठाता)
**श्री भारतवर्षीय दिगम्बर जैन श्रुत पुत्र पीठ**
कार्यालय : ४३८, चंद्रिका, कालानी नगर, विमान पत्तनमार्ग, इन्दौर (म. प्र.)
दूरभाष : ०७३१-२६२९९११ / मो. ०-९४२५०-७७७७४ / parikshalaya@yahoo.co.in




# काय नवरात्री जैनेतरांकडून जैनांकडे आलेले मिथ्यात्व आहे ?

## (परमताच्या अपेक्षेने लेख क्र. – 1)

**– हेमन्त काला, इन्दौर (म.प्र.)**

**जिज्ञासु :** पंडितजी, काय जैनी नवरात्रोत्सव साजरे करू शकतात ?

**पंडितजी :** का ?

**जिज्ञासु :** नाही, कारण की काही विद्वानांकडून ऐकले होते की हे जैनेतरांकडून जैनांकडे आलेले मिथ्यात्व आहे ? काय हे सत्य आहे ?

**पंडितजी :** तुमच्या सह पाठकांना हे ऐकून आश्चर्य वाटेल की जैनेतरांजवळ नवरात्री साजरे करण्याचे जैनांना संतुष्ट करण्यासारखे असे एक ही उत्तर नाही, ज्याला आपण तर्कसंगत म्हणू शकतो, त्यामुळे नवरात्रोत्सवाची परम्परा अन्यांकडून प्रभावित होऊन आमच्या जवळ आली असे तर्क नवरात्री च्या प्रसंगात दिले जाऊ शकत नाही.

या विषयी जैनांतर्फे जे उत्तमोत्तम तर्क दिले जाऊ शकते ते असे की जेव्हा देवलोक आषाढ शुक्ला नवमी ते कार्तिक शुक्ला एकादशी पर्यन्त विश्राम करण्यासाठी जातात, तर मग त्यांना सिद्ध व प्रसन्न करण्याची साधना त्या काळात कशाप्रकारे केली जाऊ शकते ? अर्थात् कदापि केली जाऊ शकत नाही. त्यामुळे नवरात्री जैनांकडून

अन्यमतिंकडे गेली, असे तर म्हटले जाऊ शकते, परन्तु अन्यमतिंकडून आपल्याजवळ आली असे म्हटले जाऊच शकत नाही.

विषयाला आणखी सुलभ करायचे असेल तर याला अशा प्रकारे ही समजले जाऊ शकते की नवरात्रींच्या तिथि चे निर्धारण व आराधनेचे निर्देश जिथे चार ही वेद व उपनिषदांच्या मतात नाही, तिथेच वाल्मिकी कृत रामायण महर्षि वेद व्यास कृत महाभारतात ही याचे संकेत नाहीत. त्याचप्रमाणे या विषयी देवी भागवत् पुराणाला सोडून शेष सर्व वैदिक पुराण देखील मौन आहेत. नवरात्रीचे वर्णन देवी भागवत पुराणाशिवाय अन्य कोणत्याही साहित्यात मिळत नाही. हो ! मार्कण्डेय पुराणात ही याचे पुसट पुसट संकेत मात्र आहेत, ते ही शरद ऋतुच्या नवरात्रीचे बाकी दुसऱ्या नवरात्रीं विषयी ते ही मौन आहेत. या ठिकाणी आणखी एक विषय स्पष्ट करून देतो की देवी भागवत् पुराणात ही देवीच्या गुप्त व प्रकट नवरात्रींविषयी फक्त संकेत अवश्य आहेत, परन्तु याची सुरुवात का व कशी झाली, याविषयी कोणतेच इशारे नाहीत. कारण की त्यांच्या इथे एक शक्ति स्वरुपा देवीची दुर्गादि नऊ देवींच्या रुपात उत्पत्ति कोणत्या न कोणत्या कारणाने झाली आहे, त्यामुळे त्यांच्या उत्पत्तिचे कोणतेही एक काळ असू शकत नाही व त्यांच्या उत्पत्तिचे काळ भिन्न–भिन्न व सादि असल्यामुळे देवी च्या नऊ रुपांच्या आराधनेचे नवरात्री पर्व ही सनातन म्हटले जाऊ शकत नाही. कारण की देवीच्या नऊ रुपांच्या आराधनेचे नवरात्री पर्व कुठल्याच अपेक्षेने सनातन म्हटले जाऊ शकत नाही, त्यामुळे त्याची उत्पत्ति का व कशी झाली चे विधान ही मिळायलाच हवे, ज्याचे देवी भागवत पुराणामध्ये अभाव आहे व अभाव असल्याने यथार्थ कमी व कल्पित अधिक भासते.

या पर्वाच्या सादि असण्यामध्ये बहुमूल्य तर्क असे ही आहे की कविकुल श्रेष्ठ महाकवि कालिदास, जे की वैदिक संस्कृति चे पोषक म्हटले जातात, यांनी आपल्या महाकाव्य मेघदूत मध्ये शरद ऋतुचे वर्णन केले, परन्तु शरद ऋतुमध्ये सम्पन्न केल्या जाणाऱ्या नवरात्रोत्सवाचे नाही. त्यामुळे म्हटले जाऊ शकते की त्यांच्या काळापर्यन्त तर या पर्वाला भारतवर्षात कोणतेही स्थान नव्हते. त्याचप्रमाणे तुलसीदासजीच्या रामायणात ही नवरात्रीचे काहीच उल्लेख नाही. यावरून ही सिद्ध होते की कालीदासजी पासून तुलसीदासजी पर्यन्तच्या काळखण्डात याचे प्रतिष्ठित अस्तित्व नव्हते. एवढेच नव्हे, तर नवरात्री पर्वाविषयी सगळेच्या सगळे वेदान्ती सुद्धा एकमत आहेत, असे ही नाही.

**जिज्ञासु :** ते कसे ?

**पंडितजी :** ते असे की सगळेच वेदान्ती या पर्वाला वेदान्तींचे पर्व मानत नाहीत, कारण की यांपैकी काही वेदान्ती फक्त एक परमपिता परमेश्वर व त्यांच्या अवतारांच्या उपासनेलाच मोक्षाचे हेतु मानतात, अन्यांच्या उपासनेला नाही. त्यांच्या अपेक्षेने बाकींची उपासना फक्त आणि फक्त स्वर्गासाठीच कारण आहे, मोक्षासाठी नाही. यांमध्ये ही पुन्हा उपनिषदवादिंचा एक वर्ग असा ही आहे, जो की या शक्तिंच्या भिन्न–भिन्न अवतारांच्या उपासना व प्ररुपणांना अन्यमतिंची मानतात, वेदांची नाही.

कारण की एवढ्या सगळ्या विवक्षा या पर्वाला अन्यमतिंचे पर्व सिद्ध करण्यामध्ये बाधा उत्पन्न करीत आहेत, म्हणून नवरात्री महापर्वाला जैनांचेच पर्व मानले पाहिजे, दुसऱ्या कोणाचेही नाही.

**जिज्ञासु :** का, जैनांचेच का ?

**पंडितजी :** कारण की नवरात्री च्या या नऊ रात्रींना चक्रवर्ती भरताद्वारे तीर्थंकर परमदेवाच्या अनुष्ठान पूर्वक दिग्विजयासाठी आवश्यक विद्यांच्या सिद्धि च्या अनुष्ठानाच्या रुपात कृत, कारित, अनुमोदने पूर्वक साजरे केले गेले होते, ज्याला आम्ही पुढील लेखात विस्तारपूर्वक सांगणार आहोत.

कारण की महापुरुषांद्वारे केल्या गेलेल्या विद्या सिद्धिच्या अनुष्ठानाला फक्त ग्रंथकारांनीच स्विकारले आहे असे नाही, तर त्याला विद्यानुवादपूर्व, दृष्टिवाद आदि अंग व पूर्वांचे भेद ही निरुपित केले आहे, त्यामुळे निःशंकपणे म्हटले जाऊ शकते की जिथे ग्रंथकारांद्वारे अनुमोदित नवरात्रोत्सवाचे अनुष्ठान भरत चक्रवर्ती द्वारे स्थापित असल्यामुळे सादि आहे, तिथेच हे अनुष्ठान अंग व पूर्वांचे भेद असल्याने अनादि आहे.

एक गोष्ट आणखी, आणि ती अशी की कारण की साक्षात् श्रुतावतार चक्रवर्ती भरत स्वतः व त्यांचे मंत्री मंत्र–तंत्र विज्ञानांचे ही जाणकार होते, त्यामुळे कोणत्या काळात, कोणत्या महिन्यात, कोणत्या तिथिला, कोणत्या नक्षत्रामध्ये व कोणत्या विधिने कोणते अनुष्ठान सुलभतेने व कमी पुरुषार्थाने सिद्ध केले जाऊ शकते अथवा केले पाहिजे, याचे ही जाणकार होते. निश्चितच त्यांच्या मंत्र–तंत्र निष्णाततेमुळे फक्त नवरात्री पर्वच नाही, तर त्यांचे दशमी ला केले गेलेले दिग्विजय प्रयाण ही सम्पूर्ण विश्वासाठी महत्वपूर्ण झाले.

**जिज्ञासु :** ग्रंथांमध्ये चक्रवर्ती द्वारे विद्यादि देवतांची उपासना केली गेली, हे तर सांगितले, परन्तु कशाप्रकारे, कोणकोणत्या मंत्रांनी,

कोणकोणत्या व किती किती आहुतिपूर्वक त्या उपासनेला संपन्न केले गेले, काय याला ही सांगितले गेले आहे ?

**पंडितजी :** नाही, सांगितले गेलेले नाही. कारण की मंत्र–तंत्र विज्ञानाच्या विशिष्ट विभागाला रहस्य म्हटले गेले आहे, ज्याला की गुरु परम्परेने च प्राप्त केले जाऊ शकते, त्यामुळे मंत्र–तंत्र विज्ञानाच्या विशिष्ट क्रियांना चक्रवर्ती भरताने संपन्न केले, हे तर सांगितले, परन्तु कसे, कोणत्या मंत्रांनी व कोणकोणत्या व किती आहुतिपूर्वक यांना केले गेले, याला सांगितले नाही. कारण की त्याला सांगितले नाही, त्यामुळे आम्हाला जे सहज व सुलभतेने फक्त उपलब्धच नाहीत, तर ज्यांची उपासना करण्यात द्रव्य, क्षेत्र, काळादिंचे विशेष बंधन नसते, अशा महान कृपाळु शासन देवतांमध्ये त्या सर्व अनुष्ठानांची कल्पना करून या महोत्सवाला आम्ही संपन्न करतो.

**जिज्ञासु :** अरे बाप रे! तर काय विषय अशा प्रकारे आहे ? या अपेक्षेने तर असे जाणवते की वर्तमान काळातील जैन विद्वानांचे नवरात्री पर्वाबद्दल स्व मतात दिलेल्या निर्देशानुसार ही अध्ययन नाही व परमतात दिलेल्या निर्देशानुसार ही नाही. त्यांच्याकडून विनाकारणच सामान्य व्यक्तिची दिशाभूल करणाऱ्या परुपणा केल्या जात आहेत की नवरात्री जैनेतरांचे पर्व आहे – नवरात्री जैनांचे पर्व आहे.

**पंडितजी :** अगदी बरोबर. परंतु लक्षत ठेवा की जैनेतरांना जे आम्ही बाधित केले आहे, ते ज्यांचा उल्लेख तुम्ही केला आहे, अशा मंदबुद्धि जैन विद्वानांच्या तर्कणा शैलीनुसार केले आहे, स्याद्वाद कौशल्याच्या आश्रयाने नाही, खऱ्या अर्थाने जैनी या तर्कणा शैली चे प्रयोग करूच शकत नाहीत.

**जिज्ञासु :** का ?

**पंडितजी :** कारण की आपल्या इथे ही असे अनेक उपदेश आहेत, ज्यांचे की प्राचीन ग्रंथांमध्ये काहीच उल्लेख नाही, पण ते आज जैनांची ओळख बनून गेले आहेत.

**जिज्ञासु :** जसे ?

**पंडितजी :** जसे पाणी गाळून पिणे. पिण्याच्या पाण्याचे विधान सर्वाधिक प्राचीन श्रावकाचार श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी मध्ये ही निर्देश नाही व मुनिराजांच्या चर्येला निर्देशित करणाऱ्या ग्रंथराज श्री मूलाचारजी व त्याच्या टीकेत ही नाही.

एवढेच का तर श्री तत्त्वार्थसूत्रजी चे सातवे अध्याय, जे की एक प्रकारे श्रावकाचारच आहे, त्याच्या मूळ सूत्रांमध्ये ही जलगालनाचे

निर्देश नाहीत व त्यावर लिहिलेल्या सर्वमान्य टीका जसे श्री सर्वार्थसिद्धिजी, श्री राजवार्तिकजी, श्री श्लोकवार्तिकजी आदिंमध्ये ही याचे वर्णन नाही. याशिवाय श्री आदिपुराणजी, श्री पद्मपुराणजी व श्री हरिवंशपुराणजी, हे असे पुराण त्रय आहेत, ज्यांचे की स्वाध्याय बहुलतेने होते, मध्ये देखील जलगालनाविषयी कोणतेच निर्देश नाहीत.

याठिकाणी हे तर्क दिले जाऊ शकत नाही की कारण की समन्तभद्राचार्य जीं च्या काळात पाणी गाळून पिणे ही सामान्य गोष्ट होती, त्यामुळे महत्वपूर्ण व जैनींचे मुख्य धर्म असल्याने सांगितले नाही.

**जिज्ञासु :** हे तर्क का दिले जाऊ शकत नाही ?

**पंडितजी :** कारण की हे तर्क दिल्याबरोबर असे सिद्ध होईल की कारण की जैनी फक्त व्यभिचारीच नव्हते, तर भक्ष्याभक्ष्याचे ज्ञान ही त्यांना नव्हते, त्यामुळे त्यांना ब्रह्मचर्याणुव्रत व भोगोपभोग परिमाण व्रतादिंमध्ये भक्ष्याभक्ष्याचे ज्ञान करविले गेले आहे.

काय अशा प्रकारच्या बाधांसाठी आपण तैयार आहोत ? निश्चितच नाही.

त्यामुळे इथं, जैनांमध्ये पाहिल्या जाणाऱ्या पाणी गाळून पिण्याच्या विधानाला असे म्हणून मिथ्या म्हटले जाऊ शकत नाही की कारण की पाणी गाळून पिण्याचे निर्देश सर्वमान्य व प्राचीन एकाही श्रावकाचार अथवा मूलाचार वा पुराणग्रंथांमध्ये नाही, म्हणून पाणी गाळून पिणे हे जैनांचे आवश्यक कर्तव्य नाही.

कारण की असे म्हटले जाऊ शकत नाही, त्यामुळे या विधानानुसार सिद्ध झाले की कारण की जैनांचे तत्त्व, विधि व विज्ञान ही प्रत्येक विषयात विखुरलेले आहे, त्यामुळे या ग्रंथामध्ये लिहिले आहे, त्यामध्ये नाही, या काळात लिहिले आहे, त्या काळात नाही, या भाषेत लिहिले आहे, त्या भाषेत नाही, या आचार्यांनी लिहिले आहे, त्या आचार्यांनी नाही आदि तर्क देऊन आपण कोणत्याही मतवाल्यांना बाधित करु शकत नाही व जो बाधित करतो त्याला न्यायविद् अथवा स्याद्वादी म्हटले जाऊ शकत नाही.

त्यामुळे याठिकाणी अर्थात् नवरात्री प्रकरणामध्ये आम्ही ज्या तर्कांच्या आश्रयाने, जैनेतरांना बाधित करण्याचे उपक्रम केले आहे, ते जैन मूढ तर्क शास्त्रींच्या निर्णय करण्याच्या शैलीच्या आश्रयाने, त्यांच्याच मताच्या खण्डणासाठी केले आहे ज्यामध्ये दृढतेने म्हटले जात आहे की नवरात्री हे जैनांचे उत्सव नाही.

जर आम्ही या शैलीमध्ये परमत वादिंना बाधित करण्याचे दुःसाहस केले, तर ते आपल्यानंतर परन्तु त्यांच्या आधी आपणच बाधित होऊन जाऊ.

आमच्या अपेक्षेने तर जर कोणतेही पर्व, परंपरा वा विधान जैनी व जैनेतरांमध्ये सोबत एकाच वेळी अथवा वेगवेगळ्या काळात प्राप्त होत असले, तरी त्याला जैनेतर आपल्या कारणाने मानतात व पालन करतात व जैनी आपल्या कारणाने.

दोघांच्या बाह्य क्रिया व निमित्तांचे सेवन एक अथवा एकाच प्रकारचे असल्यावर ही त्या बाह्य क्रिया व निमित्तांचे सेवन करणारी अंतरंग कारणे ही समानच असतील असे नियम नाही. अंतरंग हेतु भाव वेगवेगळे असल्याने बाह्य क्रिया व निमित्त एक असून ही वेगवेगळेच आहेत, असे सर्वच वादींद्वारे सहजच ग्रहण केले जाते अर्थात् यांविषयी जैन, जैनाभासी व जैनेतरां मध्ये कुठलेही विवाद नाही.

जसे ज्या द्रव्य व फळांच्या कांक्षेने मी साधुंची अर्चना करतो, त्याच द्रव्य व फळांच्या कांक्षेकरिता मी अरिहंत व सिद्धांची देखील पूजा करतो, परन्तु बाह्य द्रव्य, मंत्र व पूजेची विधि समान असण्याचा अर्थ असा नाही की मी साधु व अरिहंतांना एकच मानून घेतले आहे.

निश्चितच या स्याद्वाद तंत्राला सर्वत्र स्वीकार करून स्याद्वादींनी व्याख्यान केले पाहिजे, अन्यथा स्व–वचन बाधित आदि दोषांची शक्यता कायम राहील.

**जिज्ञासु :** उपसंहार ?

**पंडितजी :** हेच की नवरात्री जैनांकडून जैनेतरांकडे गेली, असे तर म्हटले जाऊ शकते, परंतु जैनेतरांकडून जैनांकडे आली असे कुठल्याच अपेक्षेने म्हटले जाऊ शकत नाही.

॥ इत्यलम् ॥

**॥ चिंतनास अवसर पुढील विषय ॥**

पं. हेमन्तजी काला द्वारे भगवंताच्या वीतरागतेत च पूज्यतेचे एकांत करणाऱ्यांना चिंतन व मनन करण्यास बाध्य करणारा पुढील विषय, ज्यावर की चिंतन, मनन, अध्ययन, लेखन व संशोधन गतिशील आहे :

"काय समवशरण स्थित वीतरागी भगवानच आमच्यासाठी पूज्य आहेत, त्यांचे सचित्त, अचित्त व मिश्र प्रातिहार्यादि नाही ?"

– वरिष्ठ संपादक : भरत काला




# काय नवरात्री जैनांचे उत्सव नाही ?

**जिज्ञासु :** पण्डितजी, नवरात्री हे जैनांचे उत्सव नाही काय ?

**पण्डितजी :** का ?

**जिज्ञासु :** नाही, काही विद्वानांकडून ऐकले होते की जैनांनी नवरात्री उत्सव साजरे करु नये, कारण की आगमात त्याचे उल्लेख मिळत नाही.

**पण्डितजी :** हे पहा, या वेळी जैनांची स्थिति फारच विचित्र झाली आहे. शास्त्र आधार दिल्यावरही करण्यायोग्य जेवढ्या क्रियांचे उपदेश शास्त्रांमध्ये दिले गेले आहेत, त्या सर्वांना हे विद्वान लोक सम्यक्त्व मानतच नाहीत, जसे की पंचामृताभिषेक, पक्व फळांद्वारे पूजन, पूजेमध्ये फूलांचा उपयोग, भगवंताच्या चरणांवर केसर लेपण पुष्प चढविणे व यज्ञोपवीत वगैरे. कारण की शास्त्राधार असल्यावरही हे विद्वान लोक या सर्व क्रियांना सम्यक्त्व मानत नाहीत, त्यामुळे शास्त्राधारे यांच्याशी चर्चा करणे व्यर्थ आहे. यांच्याशी तर युक्ति व हे ज्यांना प्रमाण मानतात, त्या आचार्यांच्या आश्रयानेच चर्चा करण्यात शहाणपण आहे.

कारण की यांच्याशी युक्ति व हे ज्यांना प्रमाण मानतात, त्याच आचार्यांच्या आश्रयाने चर्चा करणे योग्य आहे, त्यामुळे यांच्याशी नवरात्री पर्वावर ही चर्चेची सुरुवात युक्ति व हे ज्यांना प्रमाण मानतात, असे आचार्य विद्यासागरजी महाराजांचे शिक्षा–दीक्षा गुरु आचार्य ज्ञानसागरजी महाराजांना तुमच्या जिज्ञासेच्या समाधानार्थ चर्चेच्या केन्द्रात ठेवून चर्चेची सुरुवात करु या. बरं, इथे हे सांगा की मी किती प्रकारचे पर्व सांगितले होते ?

**जिज्ञासु :** दोन प्रकारचे.

**पण्डितजी :** ते कोणकोणते ?

**जिज्ञासु :** एक अनादि व दूसरे सादि. अनादि पर्व पर्युषण, आणि सादि राखी वगैरे।

**पण्डितजी :** अगदी बरोबर. नवरात्री उत्सवाला सुद्धा आपण सादि व अनादि दोन्ही प्रकारे सिद्ध करू शकतो, परन्तु सर्वप्रथम सादि. या उत्सवाला आचार्य महावीरकीर्तिजी महाराजांच्या परम्परेतील

सुप्रसिद्ध आचार्यां मध्ये स्वाध्याय प्रेमीच्या रुपात प्रतिष्ठित आचार्य पद्मनन्दिजी पासून ते मासोपवासी संत आचार्य निश्चयसागरजी महाराजापर्यन्त सर्वच मान्य करतात. या परम्परेने अनुभव व आगमाच्या आश्रयाने या उत्सवाला सादिचे रुप प्रदान केले आहे. बरं, विषय सुलभ करण्याच्या दृष्टिने इथं हे सांगा की वर्तमान काळात आपल्या सर्वाजवळ उपचारानेच म्हणा, पण जे सम्यक्त्व पाहिले जाते, त्याचे नाव काय आहे?

**जिज्ञासु :** क्षयोपशम सम्यक्त्व.

**पण्डितजी :** याचे लक्षण काय आहे?

**जिज्ञासु :** चल, मल व अगाढ दोषांनी जे सहित असते त्याला क्षयोपशम सम्यक्त्व असे म्हणतात.

**पण्डितजी :** बरं, आता हे सांगा की अगाढ दोष म्हणजे काय ?

**जिज्ञासु :** जे गाढ नाही, त्याला अगाढ असे म्हणतात, जसे वृद्धाच्या थरथरणाऱ्या हातातील काठी. वृद्धाच्या थरथरणाऱ्या हातातील काठी जशी थोड्याशा धक्क्याने ही सुटून जाते, तसेच हे सम्यक्त्व सुद्धा आहे. हे सम्यक्त्व सुद्धा मिथ्यादृष्टिंद्वारे आम्हाला प्रभावित करणाऱ्या अगदी क्षुल्लक कारणाने देखील सुटू शकते.

**पण्डितजी :** अगदी बरोबर. याच अगाढ दोषामुळे अनेक जैन बांधव अन्यमतिंकडे आकर्षित झाले होते. काही वर्षांपूर्वी अन्यमतिंद्वारे प्रभावशाली पद्धतीने साजरे केले जाणारे नवरात्री उत्सव पाहून अनेक जैन बांधव त्यांच्याकडे आकर्षित झाले व अनेकांनी तर त्यांच्या प्रभावात येऊन महान पुण्योदयाने प्राप्त जैन धर्म सुद्धा सोडून दिले होते. अशा लोकांवर कृपा करून गणधराचार्य कुन्थुसागरजी, आचार्य पद्मनंदिजी, प्रज्ञाश्रमण आचार्य देवनंदिजी, आचार्य गुणधरनंदिजी, आचार्य निश्चयसागरजी, आचार्य कल्पश्रुतनंदिजी, आचार्य वैराग्यनंदिजी, आदि आचार्यांनी मिळून ज्याचे की श्रावकगण नवरात्री व्रताच्या रुपात व्यक्तिगत रुपात पालन करीत होते, त्यालाच सार्वजनिक महामहोत्सवाचे रुप दिले. लोक आता नवरात्री पर्वाच्या काळात इकडे–तिकडे न जाता जिथे–जिथे आचार्य महावीरकीर्तिजी महाराजांच्या परम्परेचे शिष्यगण वास करतात, तिथे–तिथे जाऊन हे पर्व शासन देवता व कुलदेवता उपासना पर्वाच्या रुपात साजरे करतात.

**जिज्ञासु :** काय, जैनांचे ही कुळदेवता असतात ?

**पण्डितजी :** हो ! असतात. आचार्य विद्यासागरजी महाराजांचे शिक्षा–दीक्षा गुरु आचार्य ज्ञानसागरजी महाराजांनी स्वतः जैनदर्शन,

न्याय व साहित्याचे अद्वितीय ग्रन्थ द्विसंधान महाकाव्यादि ग्रन्थराज ज्यांना की सामान्य विद्वान तर स्पर्श करण्याचे विचार देखील करु शकत नाहीत व सामान्य श्रावक/स्वाध्याय प्रेमींनी तर ज्यांचे नाव ही ऐकले नाही, च्या आश्रयाने व स्वानुभवाने श्रीजयोदय महाकाव्यजी मध्ये प्रत्येक जैनाने आपापल्या कुळदेवतांची उपासना केली पाहिजे चे विधान द्वितीय सर्गातील श्लोक क्र. 39 मध्ये केले आहे. याच सादि सनातन विधानानुसार खण्डेलवाल, दशा हुमड, वीसा हुमड आदि दिगम्बर जैन धर्माचे पालन करणाऱ्या 84 जातिंमध्ये जेवढे गोत्र असतात, त्या सर्वांमध्ये त्या-त्या गोत्रांच्या कुळदेवतांचे विधान पाहिले जाते, त्यामुळे ज्या जैनांच्या इथे वंश परम्परेने आलेल्या कुळदेवतांच्या स्थापना पाहिल्या जातात, त्यांच्या इथे आजही नवरात्रीमध्ये कुळदेवतांच्या स्थापना निदर्शनास येतात. आचार्य ज्ञानसागरजी महाराजांद्वारे केलेले कुळदेवतांचे उल्लेख दर्शविते की त्यांच्या वंशपरम्परेतही गोत्राप्रमाणे उल्लेखित कुळदेवतांची नवरात्रीमध्ये ही उपासना-साधनेची परम्परा होती. निश्चितच या पर्वाला अनादि सिद्ध करण्यासाठी हे प्रमाण पुष्कळ आहे. दुसऱ्या प्रमाणांची चर्चा या लेखाच्या शेवटी करू या.

**जिज्ञासु :** याठिकाणी आपण श्रीजयोदय महाकाव्यजी चे च उदाहरण का दिले ?

**पण्डितजी :** या महाकाव्याची फक्त आचार्य विद्यासागरजी महाराजांच्या संघातच नाही, तर शास्त्री व विद्वत् परिषदाच्या सदस्यांमध्ये ही अद्भूत मान्यता आहे. दिनांक 29.09.1995 ते 03.10. 1995 पर्यन्त मदनगंज किशनगड (राज.) मध्ये विद्वत संगोष्ठी याच ग्रंथराजाच्या सम्मानात मुनिपुंगव सुधासागरजी महाराजांच्या सान्निध्यात ठेवली गेली होती, ज्यात प्रथम श्रेणीतील 54 विद्वानांच्या सखोल अध्ययनानंतर याला विश्वातील महानतम् ग्रंथांपैकी एक घोषित व सिद्ध केले होते आणि कारण की नवरात्री पर्वाचे निषेध करणारे हेच विद्वान व आचार्य विद्यासागरजी महाराजांकडून फक्त दीक्षितच नाही, तर आचार्य ज्ञानसागरजी बद्दल बहुमान प्रकट करण्यात ते दमतही नाहीत. त्यामुळे त्यांना जे त्यांना मान्य आहेत अशा आचार्य भगवंताचे प्रमाण देऊन आपले मत प्रकट करीत आहोत. अन्यथा या विषयी आचार्य ज्ञानसागरजी महाराजांच्या पूर्वी होऊन गेलेल्या नय-निक्षेप पारंगत आचार्यांच्या उपदेशांची सुद्धा कमतरता नव्हती.

**जिज्ञासु :** त्यांपैकी काहींचे नाव आपण सांगू शकता ?

**पंडितजी :** हो! या विषयी सर्वाधिक चर्चित तीन नावे आहेत.

1. मुनिपुंगव सुधासागरजी महाराज 2. नियमसागरजी महाराज 3. आर्यिका गुरुमति माताजी व विद्वानांमध्ये विद्वत् व शास्त्री परिषदाचे 13 पंथ आम्नायाला मानणारे जवळपास सर्वच विद्वद्गण आहेत. परन्तु हो ! या नावांना गौण करून एक सूत्र नेहमी लक्षात ठेवा की जे कार्य करण्यात सम्यक्त्वाचे घात व मिथ्यात्व पोषणाचे दूषण येत नसेल, ते कार्य करण्यास काहीच हरकत नाही. कारण की आचार्य ज्ञानसागरजी महाराज, ज्यांचे मत पूर्वाचार्यांच्या मताचे अनुसरण करणारे आहे, च्या मतानुसार तीर्थंकर भगवानांच्या पूजेची प्रधानता ज्यात आहे अशा शासन देवता व कुळ देवतांची पूजा–आराधना मिथ्यात्व नाही, म्हणून कुठल्याही निमित्ताने वा निमित्ताची निर्मिति करुन त्यांच्या पूजा/आराधना/उपासनेच्या ही प्रसंगांना चुकू नये व हे जाणून प्रसन्नता वाटते की आचार्य ज्ञानसागरजी महाराजांना मुख्य करून आचार्य महावीरकीर्तिजी महाराजांचे अनुकरण करणारे श्रावकादि चुकत नाहीत. परन्तु हो ! ते दिगम्बर जैन बंधु जे की आचार्य ज्ञानसागरजी महाराजानुसार जिनशासनात मान्य कुळदेवतांना ही जैनांचे कुळदेवता मानत नाहीत व शासनदेवतांना ही नाही, फक्त त्यांच्याच मतात शासन देवता व कुळदेवतांची पूजा–उपासना मिथ्यात्व आहे, जे मानतात त्यांच्या मतात नाही. त्यामुळे नवरात्रीचे निषेध करणारे जे–जे विद्वान तुम्हाला भेटले असतील, ते शासनदेवतांना न मानणारेच विद्वान असतील, मानणारे विद्वद्गण नाही. या विद्वानांना माहीतच नाही की कुळदेवतादिंच्या उपासनेचे निषेध करून त्यांनी आचार्य विद्यासागरजी महाराजांच्या शिक्षा–दीक्षा गुरु आचार्य ज्ञानसागरजी महाराजांच्या सम्यक्त्वाला प्रश्नचिह्नित करून मिथ्यात्वाचे पोषक सिद्ध केले आहे.


इन्दौर चे हेमन्त दोषी यक्ष-यक्षी सह भगवान पार्श्वनाथांचे पंचामृताभिषेक करते वेळी।

**जिज्ञासु :** काय चा. च. आचार्य शांतिसागरजी, आचार्य पायसागरजी, आचार्य वीरसागरजी, आचार्य महावीरकीर्तिजी, आचार्य शिवसागर जी, आचार्य धर्मसागरजी आदि आचार्य सुद्धा शासनदेवतांना मानणाऱ्या परम्परेचेच होते ?

**पण्डितजी :** होय ! होते. पहा, आत्ताच तुम्ही जेवढ्या

आचार्यांची नावे घेतली, ते सर्व आचार्य पंचामृताभिषेकाचे पक्षधर होते. ज्यात दशदिक्पालादिंचे आह्वान, स्थापना, सन्निधिकरण पूर्वक अर्घार्पणाचे विधान नियमतः प्राप्त होते. व कारण की या आचार्यांपैकी कोणीही पंचामृताभिषेक पाठातून दश दिक्पालांचे आह्वान, स्थापन, सन्निधिकरणपूर्वक दिलेल्या अर्घ्यार्पणाच्या मन्त्रांचे लोप करून पंचामृताभिषेक करण्याचे उपदेश कधीच दिले नाही, त्यामुळे आपण निःशंकपणे म्हणू शकतो की हे सर्व पूर्वाचार्य आचार्य ज्ञानसागरजी प्रमाणे शासन देवता, कुळदेवता व दिक्पालादिंना मानणाऱ्या परम्परेचेच होते.

**जिज्ञासु :** आचार्य ज्ञानसागरजी महाराज पंचामृताभिषेकाचे पोषक होते, याविषयी श्री जयोदय महाकाव्याशिवाय ही काही दृढ पुरावे आहेत काय ?

**पण्डितजी :** हो ! हो ! आहेत, आपल्या दीक्षा दिवस 30 जून 1968 ला स्वतः आचार्य विद्यासागरजी महाराजांनी आचार्य ज्ञानसागरजी व सम्पूर्ण दिगम्बर जैन समाजाच्या उपस्थितित पंचामृताभिषेक सार्वजनिक रुपात केले होते. त्यादिवशी त्यांच्या सोबत ब्र. प्यारेलालजी, पं. विद्याकुमारजी सेठी व ते, ज्यांना आचार्यश्रींचे माता पिता बनण्याचे सौभाग्य मिळाले होते, असे श्री हुकुमचन्दजी लुहाडिया व त्यांच्या धर्मपत्नी आणि महेन्द्रकुमारजी बोहरा यांनी सुद्धा अभिषेक केले होते.



नवरात्री महापर्वाच्या वेळह क्षेत्रपाल बाबा की पुष्प सज्जा निहारते भरत काला, इन्दौर

ही ऐतिहासिक घटना सुद्धा या सत्याची पोषक आहे की आचार्य ज्ञानसागरजी महाराजांनी ज्या कुळदेवता उपासनेचे विधान श्री जयोदय महाकाव्यजी मध्ये केले आहे, त्याला दश दिक्पालादि देवतांचे आह्वान, स्थापन, सन्निधिकरण व अर्घार्पण पूर्वक केल्या जाणाऱ्या पंचामृताभिषेकात मान्य करीत दीक्षेच्या पूर्वी आचार्य श्री कडून सार्वजनिक रुपात करविले ही होते.

अशा प्रकारे सिद्ध झाले की ज्ञान व वय वृद्ध आचार्य ज्ञानसागरजी महाराज सुद्धा दिक्पाल आदिंना मुख्य करून शासन देवतांच्या आह्वान स्थापन, सन्निधिकरणपूर्वक केल्या जाणाऱ्या अर्चनेचे पक्षधर होते विराधी नव्हते. त्यामुळे दिगम्बर जैनांनी निमित्त प्राप्त करून अथवा निमित्ताची निर्मिति करून नवरात्री आदिंमध्ये

केल्या जाणाऱ्या शासन देवता बहुमान महोत्सवाला मिथ्यात्व न मानता बिन चुकता करावे.

## || नवरात्रोत्सवाला अनादि सिद्ध करणारे आगम प्रमाण ||

श्री आदिपुराणजी मध्ये उल्लेख मिळते की भरत चक्रवर्ती दिग्विजय यात्रे साठी शरद ऋतुमध्ये निघाले होते. त्याठिकाणी जरी ऋतु चे वर्णन आहे, परन्तु तिथि महीना आदिंचे उल्लेख नाही. तरीदेखील उत्तरप्रतिपत्तिनुसार वर्षाऋतु भाद्रपद कृष्णा अमावस्येला समाप्त होऊन आश्विन शुक्ला प्रतिपदेला शरद ऋतु प्रारम्भ होतो. त्यामुळे चक्रवर्ती भरताच्या दिग्विजय यात्रेचे शुभ मुहुर्त शरद पौर्णिमेच्या 15 दिवसापूर्वी किंवा 15 दिवसानंतरच्या दरम्यानचे असले पाहिजे. शरद ऋतुच्या कोणत्या तिथिला भरत चक्रवर्ती दिग्विजया साठी निघाले होते, या प्रश्नाचे उत्तर श्री भरतेश वैभवात मिळते की त्यांनी आपल्या दिग्विजयाचे सूत्रपात शरद ऋतुच्या दशमीला केले होते, ज्याला की जैनाजैन सर्वजण विजयादशमी पर्वाच्या रुपात जाणतात व साजरे करतात.

भरतेश वैभवात सांगितले आहे की विजयादशमीच्या पूर्वीचे नऊ दिवस भरत चक्रवर्ती द्वारे ज्यांची उपासना केली गेली अशा विविध प्रकारच्या अनुष्ठानांचे ते दिवस होते, ज्यात चक्ररत्नाला मुख्य करून अनेक प्रकारचे विजय यज्ञ सिद्ध केले गेले. व कारण की हे अनुष्ठान नऊ दिवस अहर्निश चालले होते, त्यामुळे याला नवरात्री विधान हे नाव सहजच प्राप्त झाले.

**जिज्ञासु :** आम्ही असे ऐकले आहे की चक्रवर्तीच्या चक्ररत्नाला जास्तीत जास्त 1200 वर्षांपूर्वीच्या प्राचीन ग्रन्थ जसे श्री आदिपुराणजी आदिं मध्येच पूज्य म्हटले आहे, त्यापूर्वीच्या एकाही ग्रन्थांमध्ये नाही, कारण की त्यापूर्वीच्या एकाही ग्रन्थामध्ये चक्ररत्नाला पूज्य म्हटले गेलेलेच नाही, तर मग त्याला पूज्य कसे स्वीकार करावें, आपणच सांगा ?

**पण्डितजी :** कोण म्हणतो की आदिपुराणजी च्या पूर्वी लिहिलेल्या ग्रन्थांमध्ये चक्रवर्तीच्या चक्ररत्नाच्या पूजेचे उल्लेख मिळत नाही ? निश्चितच जो असे म्हणतो, त्याने ज्याला जैनांचे प्राण म्हटले जाते, असे दोन हजार वर्ष प्राचीन ग्रन्थ श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी चे स्वाध्यायच केलेले नाही असे म्हणावे लागेल.

पहा श्री रत्नकरण्डश्रावकाचारजी कारिका क्र. 41, जी की सम्यग्दर्शन अधिकाराची शेवटची कारिका आहे, मध्ये सांगितले आहे

की :–

**देवेन्द्रचक्रमहिमानममेयमानम्,**
**राजेन्द्रचक्रमवनीन्द्रशिरोर्चनीयम् ।**
**धर्मेन्द्रचक्रमधरीकृतसर्वलोकम्,**
**लब्ध्वा शिवं च जिनभक्तिरुपैति भव्यः ।।**

अर्थ :– जिनेन्द्र भक्त सम्यग्दृष्टि पुरुष :– 1. देवेन्द्राच्या चक्रासह इन्द्रांच्या महिमेला, 2. मुकुट बद्ध राजांच्या मस्तकांनी अर्चनीय चक्रवर्तीच्या चक्ररत्नाला व 3. सम्पूर्ण लोकाला नमविणाऱ्या तीर्थंकराच्या धर्मचक्राला प्राप्त करून मोक्ष प्राप्त करतो.

वरील कारिकेत जिनेन्द्र देवाचा उत्तमोत्तम भक्त तीन प्रकारच्या विभूतिंनी विभूषित होऊन मोक्ष प्राप्त करतो असे म्हटले गेले आहे. त्या तीन विभूतिंपैकी दुसऱ्या क्रमांकाच्या विभूतिबद्दल सांगताना आचार्य भगवंत अत्यंत स्पष्ट शब्दात सांगतात की जिनेन्द्र देवाचा भक्त मुकुटबद्ध राजांच्या मस्तकांनी अर्चनीय चक्ररत्नाला प्राप्त करून मोक्ष प्राप्त करतो.

आता तुम्हीच सांगा की ज्या चक्ररत्नाची अर्चना मुकुटबद्ध राजांनी आपापल्या मस्तकांनी केली असेल, ते संसारातील कोणत्या द्रव्यांनी अपूजनीय म्हटले जाऊ शकते ?अर्थात् त्याला संसारातील अन्य कोणत्याही द्रव्याने अपूजनीय म्हटले जाऊच शकत नाही.

लक्षात ठेवा की ज्याची पूजा मस्तकाने तर झाली, परन्तु काही कारणामुळे अन्य द्रव्यांनी होऊ शकली नाही, तरीही त्याची पूजा संसारातील सर्व द्रव्यांनी केली गेली, असेच म्हटले जाईल, परन्तु जर कोणाची पूजा संसारातील सर्व द्रव्यांनी तर झाली, परन्तु मस्तकाने झाली नाही, त्याची पूज्यता सशंकच म्हटली जाईल, निःशंक नाही.

कारण की चक्ररत्नाची अर्चना स्वतः मुकुट बद्ध राजांनी आपापल्या मस्तकांना अर्पित करून/नमवून केली आहे, त्यामुळे श्रीमद् समन्तभद्राचार्य जींच्या अपेक्षेने चक्ररत्नाच्या पूज्यते विषयी कुठल्याही प्रकारची शंका केली जाऊ शकत नाही व जो करतो त्याच्या मतानुसार समन्तभद्राचार्य जींचे सम्यक्त्व सशंक होते, असेच सिद्ध होईल.

या ठिकाणी एक नियम अजून आहे, आणि तो हा की ज्याने आपल्या उत्तमांग मस्तकाने ज्याची अर्चना केली, त्याने आपल्या जवळ असलेले असे कोणते उत्तम द्रव्य असेल, ज्याने अर्चना केली नसणार ? निश्चितच त्याने आपल्या जवळ असलेल्या सर्व उत्तम द्रव्यांनी पूजा करून बाकी उरलेले द्रव्य शेषाक्षत म्हणून ग्रहण केले असणार.

यालाच "पुण्यं समग्र महमेकमनाजुहोमि" असे म्हणतात. त्यामुळे प्रिय बन्धु, श्री आदिपुराणजी मध्ये जे चक्ररत्नाच्या पूजेचे विधान केले गेले आहे, त्याला श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी चे अनुकरण करीतच केले गेले आहे, अन्य प्रकारे नाही.

पुन्हा श्री आदिपुराणजी मध्ये फक्त चक्ररत्नाच्याच पूजेचे उपदेश दिले गेले आहे, असेही नाही, परन्तु ज्याला श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी च्या वरील उपदेशाच्या आश्रयाने श्रुतज्ञानावरण कर्माच्या अगदी सामान्य क्षयोपशमाद्वारे सुद्धा समजले जाऊ शकते, अशा विजयाच्या इच्छुक बाकी क्षत्रियांसाठी ही उपदेश आहे. त्याठिकाणी सांगितले गेले आहे की विजयाच्या इच्छुक प्रत्येक क्षत्रियाने आपापल्या आयुधांच्या अधिष्ठाता देवतांचे अर्चन भल्या प्रकारे केले पाहिजे व याच आदेशाचे अनुकरण करताना बुन्देलखण्डच्या परवार व गोलापूरव समाजाचे बहुसंख्य जैन बांधव विजयादशमी अर्थात् ज्या दिवशी चक्रवर्ती भरत दिग्विजय यात्रेसाठी निघाले होते, त्या दिवशी, आपापल्या आयुधांवर आयुधांच्या अधिष्ठाता देवतांची स्थापना करून अर्चना करताना आज ही दिसून येतात. याच सूत्राचे अनुसरण करून वैश्य/व्यापारी वर्ग वहीखात्याच्या अधिष्ठात्री देवी लक्ष्मीजी ची आपापल्या वहीखात्यांवर स्थापना करून दीवाळीला अर्चन व पूजन करतात. लक्ष्मीपूजनाचे विधान ही आगमाच्या आश्रयाने आचार्य ज्ञानसागरजी महाराजांनी श्री जयोदय महाकाव्यजी मध्ये केले आहे. ज्याला की हिन्दी अनुवादाद्वारे नाही, तर, स्वतः आचार्य ज्ञानसागरजी द्वारे केल्या गेलेल्या संस्कृत स्वोपज्ञ टीकेद्वारे सुलभतेने समजले जाऊ शकते. याचप्रमाणे अन्य वर्णांचे विधान ही समजले पाहिजे.

याठिकाणी श्री रत्नकरण्डश्रावकाचारजी च्या आश्रयाने आणखी एक गोष्ट स्पष्ट झाली की मस्तक अर्पण करून अर्थात् स्वतःला पूर्णपणे समर्पित करून ज्यांची अर्चना केली जाते ते फक्त देव, शास्त्र व गुरुच नसून, चक्रवर्ती व चक्ररत्नाचे अधिष्ठाता देव ही असतात.

निश्चितच याठिकाणी हे सांगण्याची मुळीच गरज नसावी की जिनेन्द्र भगवंताची भक्ति/वन्दना असे स्पष्ट निर्देश श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी च्या या कारिकेत असताना सुद्धा फक्त जिनेन्द्र देवालाच पूज्य न म्हणता त्यात श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी मध्येच अन्यत्र सांगितलेल्या शास्त्र व गुरुंना समाविष्ट करून देव, शास्त्र व गुरुंच्या वन्दनादिंचे व पुन्हा ज्याला रत्नकरण्ड श्रावकाचारजी मध्ये सांगितले

गेले नाही, परन्तु ग्रन्थान्तरात सांगितले गेले आहे, अशा सिद्ध परमेष्ठी, मूक केवलि व चैत्यालयादि देवांना त्यांमध्ये समाविष्ट करून नवदेवतांच्या वन्दनादिंचे व नवदेवतांमध्ये ही पुन्हा शिखरजी आदि सिद्धक्षेत्र व गन्धोदकादि मंगल द्रव्यांना समाविष्ट करून बाकी अनेक सचित्त, अचित्त व मिश्र द्रव्यांच्या वन्दनादिंचे आम्ही व्याख्यान आपण सर्वजण करतो, त्याचप्रमाणे श्री रत्नकरण्डश्रावकाचारजी मध्ये चक्रवर्तीच्या चक्ररत्नाला पूज्य म्हटल्यावरही, ज्यांना श्री रत्नकरण्ड श्रावकाचारजी मध्ये सांगितले गेले नाही, परन्तु ग्रन्थांतरात सांगितले आहे, अशा अन्य अर्चनेच्या योग्य सचित्त, अचित्त व मिश्र द्रव्यांना समाविष्ट करून व्याख्यान केले पाहिजे, कारण की जिनेन्द्र भगवंताच्या मतात सत्य जेवढे सांगितले जाते, तेवढेच नसून ज्याला सांगितले गेले नाही, त्याने ही युक्त असते. त्याला श्रुतज्ञानावरण कर्माच्या क्षयोपशमाच्या आश्रयाने समजण्यालाच स्याद्वाद कौशल्य म्हटले जाते. याच स्याद्वाद कौशल्याच्या आश्रयाने सहजच सिद्ध होऊन जाते की चक्रवर्ती स्वतः मुकुटबद्ध राजा असतो, त्यामुळे त्याला सुद्धा मुकुटबद्ध राजांमध्ये सम्मिलित करून त्याने सुद्धा आपल्या मस्तकाने सुदर्शन चक्राची अर्चना केली, असे व्याख्यान केले पाहिजे.

अशा प्रकारे सहजतेने सिद्ध झाले की चक्ररत्नाच्या अर्चनेचे उपदेश देणारे श्रीमद् समन्तभद्राचार्य जी सुद्धा वरील न्यायानुसार शासन देवता, कुळ देवता, दश दिक्पालादिंच्या अनादिकाळापासून चालत आलेल्या उपासनेचे पक्षधर होते, विरोधी नव्हते.

**जिज्ञासु :** आपण जिनेन्द्र भक्तां पुढे 'उत्तमोत्तम' विशेषण का लावले ?

**पण्डितजी :** जर त्याठिकाणी 'उत्तमोत्तम' विशेषण जोडले नाही, तर ते तद्भव मोक्षगामी जीव जे या विभूतिंसह जन्मलेले नाहीत, जिनेन्द्र भगवंताचे भक्त सिद्ध होऊ शकणार नाही. त्यांना सुद्धा जिनेन्द्र भगवंताचे भक्त सिद्ध करण्यासाठी उपर्युक्त न्यायानुसार भक्तिच्या तारतम्यतेनुसार फळाच्या प्राप्तिचे व्याख्यान करीत चक्रवर्तीला उत्तमोत्तम भक्त निरुपित करून, बाकी तद्भव अथवा परम्परा मोक्षगामी जिनेन्द्र भक्तांना अन्य पुण्यशाली व्यक्तिंमध्ये उत्पन्न करविले पाहिजे.

## नवरात्रोत्सवाचे आगम प्रमाण – 1

चला, आता नवरात्रोत्सवाच्या आगम प्रमाणाच्या रुपात सर्वप्रथम कन्नड भाषेत लिहिलेल्या ग्रन्थराज श्री जैनेन्द्र व्रत कथा संग्रहाचे अवलोकन करू या.

नवरात्र व्रताच्या विधिचे उल्लेख वरील कन्नड भाषेत लिहिलेल्या ग्रन्थ श्री जैनेन्द्र व्रत कथा संग्रहामध्ये मिळते. या विधिमध्ये ज्या कथेचे वाचन केले जाते, ती चक्रवर्ती भरताच्या दिग्विजयाच्या यात्रेचीच आहे. या कन्नड भाषेत लिहिलेल्या ग्रन्थाचे मराठी अनुवाद कविकुंजर कालचन्द्र जिनदत्त शास्त्री, माणगांव (महा.) व बालकवि पं. जिनदत्त दादा उपाध्याय, मालगांव (महा.) च्या विद्वान द्वयांद्वारे चारित्र चक्रवर्ती आचार्य शान्तिसागरजी महाराजांचे आध्यात्म योगीच्या रुपात प्रसिद्ध शिष्य ज्यांना आचार्य श्रींच्या समोरच आचार्य पदाची प्राप्ति झाली होती, असे यतिकुल श्रेष्ठ आचार्य पायसागरजी महाराजांच्या सान्निध्यात केले गेले व याचे संशोधन चारित्र चक्रवर्ती आचार्य शान्तिसागरजी महाराजांना अत्यन्त प्रिय असे स्वस्ति श्री लक्ष्मीसेन भट्टारक पट्टाचार्य महास्वामींनी केले होते. त्या ग्रन्थराजाच्या मुद्रणाचे मोठे भार चारित्र चक्रवर्तीजीच्या प्रिय मासिक पत्र जैन बोधक चे सम्पादक विद्यावाचस्पति पं. वर्द्धमान शास्त्री यांना सोपविले गेले, ज्यांनी याच्या मुद्रणाचे कार्य सन् 1953 मध्ये पूर्ण केले. खाली दिलेली तिथि दक्षिणप्रतिपत्तिनुसार आहे, ज्यामध्ये महिन्याची सुरुवात शुक्ल पक्षाच्या प्रतिपद्‌पासून होते. उत्तरप्रतिपत्तिनुसार महिन्याची सुरुवात कृष्ण पक्षाच्या प्रतिपदेपासून होते.

ग्रन्थ : श्री जैनेन्द्र व्रत कथा संग्रह

व्रताचे नाव : नवरात्री व्रत विधि, व्रत क्रमांक : 156

पान क्र. : 1. 462/463 आणि 2. 467

1. नवरात्र व्रत विधिचे अंश (पान 462/463) :–

हे व्रत करणाऱ्याने भाद्रपद कृष्णा अमावस्येच्या दिवशी एकासन करून आश्विन शु. प्रतिपदेला सकाळी शुभ्रवस्त्र धारण करून पूजनाचे द्रव्य हातात घेऊन ईर्यापथशुद्धिपूर्वक जिनमन्दिरात जाऊन मन्दिराला तीन प्रदक्षिणा देवून जिनेन्द्र भगवंताला साष्टांग नमस्कार करावें. नंदादीप लावावा. श्री पीठावर आदिनाथ तीर्थकराची प्रतिमा गोमुख यक्ष व चक्रेश्वरी यक्षी सह स्थापित करून पंचामृत अभिषेक करावें. अष्टद्रव्यांनी अर्चन करावें. श्रुत व गणधराचे पूजन करून, यक्ष–यक्षी व ब्रह्मदेव यांचे अर्चन करावें. "ओं ह्रीं श्रीं क्लीं ऐं अर्हं आदिनाथतीर्थंकराय गोमुख यक्ष–चक्रेश्वरी यक्षी सहिताय नमः स्वाहा" या मन्त्राचे 108 पुष्पांनी जाप करावें. श्रीजिनसहस्रनाम स्तोत्र वाचून णमोकार मन्त्राचे 108 वेळा जप करावें. श्री आदिनाथ चरित्र वाचून ही व्रतकथा वाचावी. महार्घ्य घेऊन मन्दिरास तीन प्रदक्षिणा

देवून त्याने मंगल आरती करावी यथाशक्ति उपवासादि करावे. सत्पात्रांना आहारादि दाने द्यावीत. रात्री जागरण करून धर्मध्यानपूर्वक काळ व्यतीत करावे.

अशा प्रकारे नऊ दिवस पूजा करून दहाव्या दिवशी विसर्जन करावें. दहा दिवस ब्रह्मचर्याचे पालन करावें. हे व्रत भाद्रपदाच्या हस्तनक्षत्रापासून ते श्रवण नक्षत्रापर्यन्त करावें असे शास्त्रामध्ये सांगितले आहे, तरी ही याठिकाणी (दक्षिण भागांत) तिथि च्या अपेक्षेने विधि करण्याची परम्परा असल्यामुळे आम्ही त्याप्रमाणे ही विधि सांगितली आहे. अशा प्रकारे हे व्रत नऊ वर्षे करून शेवटी याचे उद्यापन करावें. त्यावेळी आदिनाथ तीर्थंकराच्या यक्षयक्षी सहित नवीन प्रतिमेची पंचकल्याणक विधिपूर्वक प्रतिष्ठा करावी. जुन्या मन्दिराचे जीर्णोद्धार करावें. दीन अनाथांना भोजन व अभयदान द्यावें.

**2. या व्रत कथेचे अंश (पान 467) :–**

या भरतक्षेत्रातील षट्खण्डांचा विजय करण्यात आम्हाला उत्तम यश, सुख, शान्ति प्राप्त होवो या उद्देश्याने भरतेशाने जिनालयात आश्विन शुक्ला प्रतिपदेपासून ते नवमी पर्यन्त अहर्निश आदिनाथ भगवंताचे यक्ष यक्षीसह पूजानुष्ठान मोठ्या उत्साहाने केले होते, म्हणून याला 'नवरात्री' व आश्विन शु. दशमी ला पूजेचे विसर्जन करून दिग्विजयासाठी त्यांनी प्रस्थान केले त्यामुळे याला 'विजयादशमी' असे म्हणतात. अशा प्रकारे अद्यापि हे महोत्सव कोणत्या न कोणत्या रुपात करण्याची जैन जैनेतरां मध्ये बलवत्तर रुढी आहे. हे युक्तच आहे. आमच्या जैन बांधवांनी हे उत्सव व्रत विधिमध्ये सांगितल्याप्रमाणे गुरुचरणामध्ये व्रत ग्रहण करून विधिपूर्वक करावें, ज्यामुळे अतुल पुण्याची प्राप्ति होऊन संसारातील सत्कार्यामध्ये यशाची प्राप्ति होऊन पुढे भविष्यकाळात पारलौकिक सुखाची सुद्धा प्राप्ति होवो.

## नवरात्रोत्सवाचे आगम प्रमाण – 2

**ग्रन्थाचे नाव : भरतेश वैभव (भाग 1–2 संयुक्त)**

**(अनुवाद : जैन बोधक मासिक पत्राचे सम्पादक पं. श्री वर्द्धमान शास्त्री, सोलापूर (महा.))**

**प्रकरण : नवरात्री संधी (पृष्ठ क्र. 181 ते 190)/ या लेखात उपयोग केलेल्या अंशांचे पान क्र. 182, 183, 189**

**1. मन्त्री द्वारे भरतेशाला दिग्विजय यात्रेसाठी प्रस्थान करण्याच्या निवेदनाचे अंश (पान : 182) :–**

बुद्धिसागर मन्त्रीच्या समयोचित निवेदनावर राजे अति प्रसन्न झाले. मन्त्रीच्या कर्तव्यपालना बद्दल प्रसन्न होऊन भरतेशाने बुद्धिसागराला अनेक वस्त्र व आभूषणे भेट केली व दिग्विजयाच्या प्रयाणाची तयारी करा अशी आज्ञा देवून सर्वांना याची सूचना देण्यास ही सांगितले. बुद्धिसागर मंत्र्याने निवेदन केले की स्वामिन्! नऊ दिवस श्रीजिनेन्द्र भगवन्ताचे पूजन वगैरे उत्सव मोठ्या आनन्दाने करवून दशमीला येथून प्रस्थानाची व्यवस्था करेन.

**2. नवरात्रोत्सव विधानाचे अंश (पान क्र. 182) :–**

अयोध्या नगरातील मोठ–मोठे राजमार्ग अगदी स्वच्छ केले गेले व त्यांवर सुगन्धित गुलाबजल वगैरे शिंपडल्यामुळे चोहीकडे सुवास दरवळू लागला होता, त्या सुवासामुळे भुंगे गुंजारव करीत होते. अयोध्येत अगणित जिन मन्दिर होते, त्यांमध्ये कुणीकडे होम चालू होते. कोठे कलिकुण्ड यन्त्राराधना चालली होती. कोठे गणधर वलय यज्ञ आणि मृत्युंजय यज्ञ चालू होते. एवढेच का ?कितीतरी मन्दिरांमध्ये बलसिद्धि, जयसिद्धि व सर्वरक्षा नामक अनेक यज्ञ विधिपूर्वक केले जात होते.

दररोजच अनेक धर्मप्रभावनेची कार्ये व दररोज रथयात्रा महोत्सव, महाभिषेक, पूजा, चतुस्संघसंतर्पण वगैरे कार्ये बुद्धिसागर मन्त्र्याच्या प्रेरणेने सुरु होते. जिनपूजेपूर्वक नऊ दिवस चक्ररत्नाचे ही पूजन करण्यात आले. त्याचबरोबर सेनेतील बाकी योद्ध्यांनी सुद्धा आप–आपल्या शस्त्र–अस्त्रांचे अनुरागपूर्वक पूजन केले.



कुण्डलपुर (दगोह) यज्ञोपवीत सह यक्षराज गोमुख व माँ चक्रेश्वरी

गोमुख यक्ष व चक्रेश्वरी यक्षिणीची पूजा करून घोड्याला रक्षक यन्त्राचे बन्धन केले गेले होते. घोड्याला यक्षदेवतेच्या नावाने संबोधण्याची परम्परा आहे. ती यासाठी की त्यावेळी बुद्धिसागर मन्त्र्याने यक्ष व यक्षिणीचे पूजन करून त्यांना रक्षित केले होते. त्याचप्रमाणे हत्ती, रथ वगैरेंचे शृंगार मोठ्या वैभवाने केले. सारांशतः महानवमीच्या नऊ दिवसांचे उत्सव मन्त्र्याने ज्याप्रमाणे साजरे केले त्यापासून नरलोकातील लोक आश्चर्यचकित झाले.

**3. नवमी च्या रात्रीचे परिदृश्य (पान : 183)**

नवमीचे प्रसंग आहे. दिवसा भरतेश नगरातील जिनमन्दिरामध्ये जाऊन (बुद्धिसागर मन्त्र्याद्वारे आयोजित) पूजा

महोत्सव पाहून आले होते. रात्रीच्या वेळी दरबारामध्ये येऊन विराजमान झाले. भरतेशाने मस्तकावर रत्नकिरीट धारण केले होते. त्याच्या प्रकाशामुळे रात्र पण दिवसासारखी वाटत होती.

**नवमीच्या अर्द्धरात्रीपासून ते विजयादशमीच्या दिवसाचे परिदृश्य (पान : 189) :–**

भरतेश मधल्या सिंहासनावर विराजमान होते. तेवढ्यात मध्यरात्रिची वेळ झाली. त्यावेळी "जिनशरण" शब्दाचे उच्चारण करीत भरतेश तेथून उठले व मन्त्री आणि सेवकांसह शस्त्रालयाकडे गेले.



श्री बावनगजाजी चे यक्षराज गोमुख आणि यक्षणी माँ चक्रेश्वरी

त्यावेळी शस्त्रालयाची शोभा निराळीच होती. अनेक शस्त्रे त्याठिकाणी व्यवस्थित ठेवली होती. त्यांच्या बलि, पुष्प, चन्दन इत्यादिक पूजनाने तिथे वीररस ओसरत होते. पंचवर्णाचे अनेक भक्ष्यविशेष व अनेक नैवेद्य विशेषांनी शस्त्रपूजा होत होती. त्याचप्रमाणे होम ही होत होते, ज्यात अनेक आज्य अन्न आदिंच्या आहुत्या दिल्या जात होत्या. धूपातून धूम निर्गमन, दीपाने प्रज्वलित ज्वाला व अनेक रंगांची पुष्पे, अनेक फळ इत्यादिंनी तिथे अनुपम शोभा होत होती. माळा, तलवार, कटारी, गदा आदि अनेक अस्त्र–शस्त्रांना पाहिल्यावर एकदम राक्षस अथवा मारिच्या मन्दिराचे भयानक स्मरण होत होते. तलवार, गदा व चन्द्रहास आदि दण्डरत्नांना ज्याप्रमाणे तिथे ठेवले गेले होते त्यामुळे सर्पमण्डळाचेच स्मरण होत होते.

रतिहास आदि कितीतरी आयुध त्याठिकाणी अग्निचेच वमन करीत होते. सानन्दक नावाची एक तलवार (खड्ग रत्न) तर अशी जाणवत होती की केव्हा चक्रवर्ती दिग्विजयासाठी प्रयाण करतील व केव्हा मला शत्रुंचे भक्षण करण्याची संधी मिळेल अशा प्रकारे जीभ बाहेर काढून जणू वाटच पाहात आहे.

काळाच्या दाढाप्रमाणे अनेक तलवारींच्या मधोमध सूर्याप्रमाणे

तेजःपुंज असलेले चक्ररत्न तिथे प्रकाशित होत होते. चक्रवर्तीने उभे राहून थोडे त्याला पाहिले.

मन्त्रीने चक्रवर्तीला प्रार्थना केली स्वामिन् ! आजपर्यन्त या चक्ररत्नाचे महावैभवाने पूजन झाले. उद्या वीरलग्न आहे, योग्य मुहूर्त आहे. त्यामुळे दिग्विजयासाठी आपण प्रस्थान करावे.

अशा प्रकारे नवरात्री च्या सिद्धिमध्ये भरतेश वैभवजी मधून हे प्रमाण सांगितले गेले.

**जिज्ञासु :** पंडितजी, तुम्ही तर आम्हाला निःशंक करून दिले. या कथेवर आपली उपसंहार टीका देण्याची कृपा करावी.

उपसंहार

**पंडितजी :** हे पहा, नवरात्रीच्या या शुभ प्रसंगावर आमच्या व तुमच्या मध्ये झालेल्या या वार्तालापाला कोणतीही टीका न करता इथे थांबविणे योग्य राहील, ज्यामुळे या वार्तालापाचे पाठकगण आपल्या बुद्धिनुसार या पर्वाविषयी निर्णय करू शकतील. याठिकाणी आम्ही त्यांना फक्त या सत्याला स्मरणात ठेवून निर्णय करण्याचे निवेदन करु इच्छितो की निमित्त मिळाल्यावर वा निमित्त उत्पन्न करून अर्थात् जमेल तसे जैनांनी शासन देवता बहुमान महोत्सवाला सुद्धा अन्य महोत्सवांप्रमाणे सम्पन्न केले पाहिजे, कारण की जिनेन्द्र भगवन्ताच्या मतात सादि व अनादि पर्वांपैकी कोणत्याही एका पर्वाचे एकान्त नाही व पर्वाचा अर्थ 'कामदं मोक्षदं' अर्थात् सम्यग्दृष्टि द्वारे धर्म व अर्थाला साधण्याची क्रिया प्रसिद्धच आहे. या उपसंहार परिशिष्टामध्ये पुन्हा एकदा आठवण करवून देतो की आचार्य ज्ञानसागरजी महाराजांच्या अपेक्षेने कुळ देवतांची केलेली उपासना मिथ्यात्व नाही.

॥ इत्यलम् ॥

## ॥ उत्तम क्षमा ॥

पर्वराज पर्युषण का, अवसर है सुखदाई।
क्षमा करें सब जीव हमें, क्षमा सभी को भाई॥
क्षमाप्रार्थी : श्री भारतवर्षीय श्रुत पुत्र पीठ व दिग्विजय परिवार

## ॥ अग्रिम निवेदन ॥

पं. हेमन्तजी काला, यां द्वारे भगवंताच्या वीतरागतेत च पूज्यतेचे एकांत करणाऱ्यांना चिंतन व मनन करण्यास बाध्य करणारी पुस्तक "आम्हीं सरागी देवाचे पूजक आहोत की वीतरागी" प्रेस मध्ये आहे. निराशे पासून बचाव करण्यासाठी आपली प्रत अग्रिम पंजीकृत करवून घ्या.

— वरिष्ठ संपादक : भरत काला



# काय पुरुष माँ पद्माचे न्हवन व श्रृंगार करू शकतो ? किंवा नाही ?

**जिज्ञासू :** पंडितजी, आज मंदिरात एक विचित्र स्थिति निर्माण झाली.

**पंडितजी :** ती कोणती ?

**जिज्ञासू :** ती अशी की मी नियमाप्रमाणे पद्मावती मातेचे अभिषेक करून त्यांना वस्त्राभरणे नेसवितच होतो की तेवढ्यात एक सज्जन, जे की बीसपंथी तर नव्हते, पण काही कारणामुळे पद्मावती मातेची उपासना करीत होते, आले व म्हणू लागले की पुरुषांनी पद्मावती मातेचे अभिषेकादि करू नये, हे तर अनर्थ आहे.

मी विचारले का, यात अनर्थ काय आहे ?

यावर ते म्हणाले की का काय, काय आपण आपल्या घरात आपल्या आई, बहिण आदिंना स्नानादि करवून वस्त्राभूषणे नेसवितो ? आणि जो नेसवितो, त्याने अनर्थ केले, असे म्हणतो की नाही ?

**पंडितजी :** यावर आपण काय उत्तर दिले ?

**जिज्ञासू :** तेच जे आपण आगम प्रकाशात समजाविले होते.

**पंडितजी :** काय ?

**जिज्ञासू :** हेच की 20 पंथींमध्ये पूजेचे अंग असल्यामुळे जसे स्त्रिया भगवंताचे अभिषेक, त्यांचे अंग पुसणे, चरणांवर चंदन लावणे व पुष्प चढविणे आदि कार्य निर्विकार भावाने करतात, परन्तु पूजेचे भेद नसल्याने घरात आपल्या वडील, भाऊ आदिंचे नाही, त्याचप्रमाणे शासन देवतांच्या पूजेचे अंग असल्याने पद्मावती मातेचे अभिषेक करणे किंवा करविणे 20 पंथींमध्ये कोणत्याच अपेक्षेने दोषाचे कारण नाही. हीच व्यवस्था किंचित् वेगळ्या प्रकारे 13 पंथींच्या इथेही आहे. त्यांच्या इथे भगवंताचे अभिषेक पुरुषांसाठी तर पूजेचे अंग आहे, पण स्त्रियांसाठी नाही. स्त्रियांसाठी पूजेचे अंग

नसल्यावरही, ते कथंचित् पूजेचे अंग आहे. व कारण की ते पूजेचे अंग ही आहे, त्यामुळे स्त्रिया भगवंताचे नग्न रुप व अभिषेक प्रयत्नपूर्वक पाहतात, ज्याला की दोषाचे नाही, तर पुण्य बंधाचे कारण मानले जाते, पण आपल्या घरात आपल्या पिता, भाऊ आदिंचे नग्न रुप व स्नान प्रयत्नपूर्वक तर दूर, कुतूहल म्हणून ही स्वेच्छेने पाहाणे दोषाचे कारण मानले गेले आहे त्यामुळे कुतूहलवशात् ही पाहण्याचे प्रयत्न करीत नाहीत, त्यामुळे हे तर्क दिले जाऊ शकत नाही की 13 पंथी स्त्रिया आपल्या घरात आपल्या वडील, भाऊ आदिंचे नग्न रुप व स्नानादि प्रयत्नपूर्वक तर दूर कौतुक म्हणून ही पाहू शकत नाहीत, त्यामुळे त्या भगवंताचे नग्न रुप व अभिषेक ही पाहू शकत नाहीत.

या तर्काच्या आश्रयाने जसे 13 पंथी स्त्रियांकडून त्यांचे अभिषेक पाहणे सोडविले जाऊ शकत नाही, त्याच प्रमाणे 20 पंथी श्रावकांकडून पद्मावती मातेचे अभिषेक आदि ही सोडविले जाऊ शकत नाही. याच न्यायाचे आश्रय घेऊन ते मंदिर जे की 13 पंथी मध्ये परिवर्तित तर करवून दिले गेले आहेत, पण बाकी परिवर्तित मंदिरांप्रमाणे पद्मावती आदि शासन देवतांचे विसर्जन करवू शकले नाहीत, त्या मंदिरांमध्ये यांची सेवा करताना यांच्या बद्दल श्रद्धावान पुरुष आज ही पाहिले जाऊ शकतात.

अर्थात् 13 व 20 दोन्ही पंथींमध्ये पूजेचे अंग असल्यामुळे ज्या क्रिया मंदिर अथवा गृह चैत्यालयामध्ये मान्य आहेत, त्याच क्रिया



घर/गृहस्थी मध्ये ही मान्य असतीलच असे नाही अथवा ज्या क्रिया घर/गृहस्थी मध्ये मान्य आहेत, त्याच क्रिया मंदिर/गृहचैत्यालयात ही मान्यच असतीलच असे नाही, त्यामुळे मंदिरात केल्या जाणाऱ्या क्रियांच्या आश्रयाने घरात केल्या जाणाऱ्या क्रियांना बाधित केले जाऊ शकत नाही व घरात केल्या जाणाऱ्या क्रियांच्या आश्रयाने मंदिर/गृहचैत्यालयात केल्या जाणाऱ्या क्रियांना बाधित केले जाऊ शकत नाही, कारण की दोन्ही क्रियांच्या फळांमध्ये विपरीतता आहे. फळाच्या विपरीततेमुळेच

घर/गृहस्थी मध्ये तांदुळ, फळ, नैवेद्य व पुष्पादिंच्या भोगोपभोगांना जिथे आरंभ/पाप म्हटले गेले आहे, तिथेच या द्रव्यांनी परमेष्ठींचे पूजन करणे व मुनिराजांना आहारामध्ये दान देणे याला महान पुण्याचे कारण म्हटले गेले आहे.

या न्यायानुसार पद्मावती मातेच्या अभिषेकाची आगमात दिलेल्या आज्ञेप्रमाणे पुरुष आपल्या आई, बहिण आदिंच्या स्नानाची स्वतंत्रता मिळवीत नाहीत व कारण की घरात आई, बहिण आदिंच्या स्नानादिंचे निषेध असल्यामुळे पद्मावती मातेच्याही अभिषेकादिंच्या अधिकारापासून वंचित होत नाही.

अर्थात् जसे पुण्य क्रिया असल्याने भगवान व मुनिराजांच्या निर्वस्त्र/नग्न स्वरुपाला प्रयत्नपूर्वक पाहाणे/निहाळण्याचे निषेध स्त्री व पुरुष दोघांसाठी दोन्ही ही पंथांमध्ये नाही, परन्तु पिता, भाऊ आदिंना प्रयत्नपूर्वक तर दूर, कौतुकवशात ही नग्न पाहण्याची इच्छा करणे स्त्रियांसाठी व आई, बहिणीला नग्न पाहण्याची इच्छा करणे पुरुषांसाठी निषिद्ध आहे, तसेच पद्मावती मातेचे विधान समजले पाहिजे.

**पंडितजी :** अरे व्वा ! आपणाला तर प्रकरण जसेच्या तसे लक्षात आहे.

**जिज्ञासू :** पंडितजी, जर लक्षात ठेवले नाही, तर पावलोपावली आमच्या पंथापासून आम्हाला विचलित करणारे उभे आहेत, त्यांच्यापासून आपली व आपल्या पंथाची, जे की आर्ष मार्गाचे पर्यायवाची आहे, रक्षणासाठी एवढी तयारी तर नेहमी ठेवावीच लागेल.

याशिवाय आम्हाला ही तर कळाले पाहिजे की ज्या मार्गाचे अनुसरण आम्ही करीत आहोत ते कोणत्या अपेक्षेने योग्य आहे.

**पंडितजी :** खूप छान, अति सुन्दर ! बरं, आता हे सांगा की आपण असे समजाविल्यावर ते काय म्हणाले ?

**जिज्ञासू :** ते या उत्तरासाठी तयार नव्हते, त्यामुळे एकदम ते काहीच बोलू शकले नाही. त्यांची अशी स्थिति पाहून आम्हीच त्यांना म्हणालो की, पहा वातावरण खूप दूषित झाले आहे किंवा करविले गेले आहे, त्यामुळे ज्या मंदिरात जाल सामाजिक सौहार्दतेच्या निर्मितिसाठी त्या मंदिराच्या व्यवस्थेला मिथ्यात्वाच्या दृष्टिने ही पाहू नका व मिथ्यात्व ही म्हणू नका. आपल्या दोघांजवळ जेवढे-जेवढे सम्यक्त्व आहे तेवढ्या-तेवढ्या सम्यक्त्वासोबत आपण एकमेकांचे आदर करीत राहावे.

**पंडितजी :** यावर ते काय म्हणाले.

**जिज्ञासू :** यावर सकारात्मक प्रतिक्रिया व्यक्त करण्याऐवजी ते रागावले व त्यांनी रागावून प्रतिप्रश्न केले कि जेवढे–जेवढे सम्यक्त्व आहे, म्हणजे नेमके काय ?

**पंडितजी :** तेव्हा ?

**जिज्ञासू :** तेव्हा आम्ही पुन्हा म्हणालो की ज्या कारण व क्रियांच्या अपेक्षेने आमच्यात व आपल्यात फरक आहे, त्या कारण व क्रियांच्या अपेक्षेने आपण दोघे एकमेकांना मिथ्यादृष्टि समजत आहोत, पण ज्या कारण व क्रियांच्या अपेक्षेने आपल्यात फरक नाही, त्या कारण व क्रियांच्या अपेक्षेने तर आपण दोघे एकमेकांचे बंधू बनू शकतो ना ?



लगेचच ते म्हणाले की हो ! हो ! हे बरोबर आहे, आणि ते उठले व उठून आम्हाला मिठी मारली व प्रतिज्ञा केली की आता ते जिज्ञासेने तर 13 व 20 पंथाची चर्चा करतील, परन्तु हीन सिद्ध करण्यासाठी नाही, कारण की पद्मावती मातेच्या अभिषेकादिंबद्दल त्यांच्या मनात ज्या शंका होत्या, त्यांचे जे उत्तर आज त्यांना मिळाले होते, त्यात बळ होते.

**पंडितजी :** बरं, आता हे सांगा की भगवान तर वीतरागी आहेत व पद्मावती माता सरागी आहे, त्यांनी जर असे म्हटले असते, तर आपण काय उत्तर दिले असते ?

**जिज्ञासू :** सर्वात आधी तर त्यांनी असे विचारलेच नसते, कारण की त्यांच्या मतात म्हणजे 13 पंथींच्या इथे ही स्त्रियांद्वारे वीतरागी भगवंतांना केलेल्या स्पर्शाला दोषाचे कारण म्हटले आहे, त्यामुळे वीतरागी असल्याने स्पर्शाच्या योग्य व सरागी असल्याने स्पर्शाच्या अयोग्य, अशा सूत्राची निर्मिति ते करुच शकत नाहीत. याशिवाय त्यांच्या इथे ही रागी–द्वेषी स्त्री–पुरुष व देवी–देवतांनी युक्त पत्र–पत्रिका व बातमी पत्रांना शिवण्याचे व वाचण्याचे निषेध नाही. त्या पत्र–पत्रिकांना व बातमी पत्रांना शिवताना व वाचताना ते

सहजच पाहिले जाऊ शकतात.

**पंडितजी :** आणि समजा की कोणा 20 पंथीने आपणाला असे प्रश्न केले की भगवान तर वीतरागी आहेत, त्यामुळे स्त्रियांनी त्यांना केलेले स्पर्श दोषाचे कारण नाही, पण पद्मावती माता तर सरागी आहे, पुरुषांद्वारे त्यांना केलेले स्पर्श निर्दोष कसे म्हटले जाऊ शकते, तर ?

**जिज्ञासू :** याचे उत्तर तर पंडितजी, परोक्ष रुपात वर दिले गेले आहे की ते स्पर्श अथवा सहवास जे की प्रवीचार अर्थात् कामसेवनाच्या श्रेणित येत नाही व ज्या सहवासामुळे मैथुन सेवनाची शंका अथवा अपवादाची शक्यता नसते, त्या सहवास व स्पर्शाला दोन्ही पंथींच्या इथे दोषाचे कारण नसल्यामुळे निषिद्ध म्हटले गेले नाही, जर म्हटले गेले असते, तर दोन्ही ही पंथांमध्ये स्त्री–पुरुषांना रागी–द्वेषी स्त्री–पुरुष व देवी–देवतांनी युक्त पत्र–पत्रिका व बातमी पत्रांना शिवण्याचे व वाचण्याचे निषेध केले गेले असते, पण त्यांना शिवण्याचे ही निषेध नाही आणि वाचण्याचे ही नाही, त्यामुळे म्हटले जाऊ शकते की वीतरागी असल्याने स्पर्शाच्या योग्य व सरागी असल्याने स्पर्शाच्या अयोग्य अशा सूत्राची निर्मिति दोन्ही पंथी करुच शकत नाहीत.

**पंडितजी :** या संदर्भात काही आगम प्रमाण ही आपल्याजवळ आहे काय ?

**जिज्ञासू :** हो ! आहे ना. श्री राजवार्तिकजीच्या स्वाध्याय काळात आपण स्वाध्याय करवित असताना सांगितले होते की देव गतितील देवांमध्ये मनुष्य गतितील पुरुष व स्त्रियांबद्दल प्रवीचार (मैथुन) व्यभिचाराचे भाव येत नाहीत. जो त्यांच्यामध्ये प्रवीचार व व्यभिचाराचे भाव मानतो तो देव अवर्णवादी आहे.

**पंडितजी :** असे नाही, सूत्र व वार्तिकासह सांगा.

**जिज्ञासू :** त्यासाठी तर पंडितजी पुस्तक उघडावे लागणार.

**पंडितजी :** उघडून घ्या तर मग. समोर कपाटात ठेवलेल्या श्री राजवार्तिकजीला मस्तकावर ठेवा, पान उघडा आणि द्या उत्तर.

**जिज्ञासू :** तत्वार्थसूत्राच्या 6 व्या अध्यायाच्या तेराव्या सूत्रात दर्शनमोहनीयाच्या आस्रवाची कारणे दिली आहेत : **केवलिश्रुतसंघधर्मदेवाऽवर्णवादो दर्शनमोहस्य ।।13।।**

या सूत्रामध्ये सांगितले गेले आहे की चतुर्णिकायच्या देवांचे केलेले अवर्णवाद ही दर्शनमोहनीय अर्थात् मिथ्यात्वाच्या आस्रवासाठी कारण आहे. याठिकाणी असे प्रश्न विचारल्यावर की देव

अवर्णवाद काय आहे ? आचार्य भगवंत या सूत्राच्या वार्तिक क्रमांक 12 मध्ये उत्तर देतात की :

**'सुरा मांसं चोपसेवन्ते देवा अहिल्यादिषुचासक्तचेतसः इत्याद्याघोषणं देवाऽर्णवादः।**

या वार्तिकमध्ये स्पष्ट सांगितले आहे की स्वर्गातील देवता देव लोकात सुरापान व मांसादिंचे भक्षण करतात अथवा (मनुष्य पर्यायातील) सती अहिल्यादि स्त्रियांना पाहून इन्द्रादिंच्या मनात प्रवीचाराचे (कामसेवन) भाव येतात, अशा व यासारख्या सर्व प्ररुपणा देवगतितील देवांचे अवर्णवाद आहे अर्थात् मनुष्य पर्यायातील स्त्रियांना पाहून देवांच्या मनात मैथुन/काम सेवनादिंचे परिणाम



उत्पन्न होतात अशा अर्थाला सांगणाऱ्या कथा जैन सिद्धान्तानुसार कपोल कल्पित आहेत, कारण की असे परिणाम देवगतितील देवांचे मनुष्य पर्याय धारिणी स्त्रियांना पाहून होतच नाहीत.

या उपदेशाला भगवान पार्श्वनाथांच्या कथेमध्ये ही लक्षात ठेवले पाहिजे. ते विद्वान जे की पंथ व्यामोहामुळे पद्मावती मातेद्वारे भगवान पार्श्वनाथांना स्पर्श करीत जे त्यांच्या रक्षणाचे उद्यम केले होते, त्याची तुलना मनुष्य पर्याय धारिणी स्त्री च्या स्पर्शाशी करण्याचे कुप्रयत्न करतात, ते पंथ व्यामोही वरील उपदेशाला जाणत नाहीत व वरील उपदेशाला न जाणता अजाणपणेच देव अवर्णवादाने दूषित प्ररुपणा करून बसतात. या दूषणापासून बचाव करण्यासाठी श्री राजवार्तिकजी च्या मताचे विस्मरण जिनमतानुयायांनी स्वप्नातही करु नये. अर्थात् नेहमी लक्षात ठेवले पाहिजे की देवगतितील देवांमध्ये व मनुष्य पर्याय धारी स्त्रियांमध्ये प्रविचार होत नाही.

जर असा नियम नसेल तेव्हा तर समजा की पृथ्वीवर अराजकताच पसरून जाईल व कर्मभूमिच्या सर्वच सुन्दर स्त्रिया मनुष्यांसाठी दुर्लभ होतील, कारण की मग असंयम गुणस्थान स्थित देव लोकच त्यांना आपल्याकरिता सुरक्षित ठेवतील. अथवा असंयम गुणस्थान स्थित देव लोकच येऊन त्यांना भोगतील व भोगून

निर्माल्याप्रमाणे पुरुषांसाठी पृथ्वीवर सोडून जातील. जर अशी स्थिति निर्माण झाली, तेव्हा तर पुण्याच्या प्रभावानेच स्त्रिया शीलवंत राहू शकतील, आपल्या पुरुषार्थाने नाही. हे तर सामान्य दूषण झाले, विचार केले तर यापेक्षा ही जास्त भयंकर दूषणांना सामोरे जावे लागेल, ज्याला की विस्तार भयाने याठिकाणी सांगणार नाही. त्यामुळेच म्हटले गेले आहे की देव गतितील देव व मनुष्य पर्यायधारी स्त्रियांमध्ये काम सेवनाच्या सूचना देणाऱ्या कथा/प्ररुपणा फक्त देवांचे केलेले अवर्णवादच नाही, तर दर्शन मोहनीय अर्थात् मिथ्यात्वाच्या आस्रवासाठी ही कारण आहेत.

**पंडितजी :** अति सुन्दर !

**जिज्ञासू :** या दृष्टिने देवगतितील देवी–देवता वीतकाम असतात अर्थात् मनुष्य पर्यायधारी पुरुष अथवा स्त्रीचे सहवास त्यांच्या मनात विकार आणत नाही. व कारण की या दृष्टिने ते वीतकाम असतात, त्यामुळे जसे वीतकाम तीर्थंकर परमदेवांचे अभिषेक करणाऱ्या, त्यांना पुसणाऱ्या, गंध लेपन करणाऱ्या अथवा पुष्पहार अर्पित करणाऱ्या स्त्री चे स्पर्श तीर्थंकर प्रभुंमध्ये दोषोत्पत्तिसाठी कारण नाही, त्याच प्रमाणे पुरुषाने पद्मावतीचे अभिषेक केले अथवा स्त्रीने धरणेन्द्र बाबांचे अभिषेक केले, तरी दोषोत्पत्तिसाठी कारण नाही.

**पंडितजी :** अति सुन्दर, पण यासोबत हे ही सांगा की या वार्तिकामध्ये देवता सुरादि सेवन करीत नाहीत, असे म्हटले आहे, व जेव्हा ते मद्याला मुख्य करून मनुष्यांद्वारे ज्याचे सेवन केले जाते अशा नैवेद्यादिंचे सेवन करीत नाहीत, तर मग त्यांच्या पुढे एवढे छान–छान व स्वादिष्ट नैवेद्यादि ठेवणे हे काय देव अवर्णवाद म्हटले जाणार नाही ?



**जिज्ञासू :** नाही, मुळीच म्हटले जाणार नाही. जसे तीर्थंकर परमदेवांचे नैवेद्यादिंनी यासाठी पूजन केले जात नाही की ते त्यांच्या साठी भक्ष्य आहेत अथवा पंचकल्याणकामध्ये राज्याभिषेकादिंच्या वेळी

भगवंताला नेसविली जाणारी वस्त्राभूषणे असा विचार करून अर्पित केली जात नाहीत की ते कर्मभूमिच्या मनुष्यांद्वारे दिलेली वस्त्रादि धारण करतात. जे प्रज्ञावान आहेत, ते या वस्त्रादिंमध्ये दिव्य वस्त्रादिंची स्थापना करून त्यांना अर्पित करतात व जे नय–निक्षेपाने हीन आज्ञा प्रधानी आहेत, ते आगम आज्ञा मानून ही क्रिया करतात. अगदी तसेच मुनिराजांच्या पूजेमध्ये अर्पित केल्या जाणाऱ्या नैवेद्यादिंच्या संदर्भात ही जाणावे की पूजेच्या वेळी परमेष्ठींना अर्पित केले जाणारे द्रव्य त्यांच्या साठी भक्ष्य आहेत, यामुळे चढविले जात नाही, तर यासाठी चढविले जाते की ते पूजेचे अंग आहे. अर्थात् आहारदाना शिवाय इतर वेळी, एवढेच काय तर आहार दानापूर्वी व आहार दानानंतर ही नैवेद्यादिंनी मुनिराजांची केलेली पूजा त्यांनी भक्षण करावे अशा बुद्धिने केली जात नाही.



हेच नियम शासनादि देवतांच्या नैवेद्यादि व वस्त्राभूषणादिंच्या अर्पणाने युक्त जी पूजन विधी आगमात सांगितली आहे, मध्ये लक्षात ठेवले पाहिजे. त्याच प्रमाणे यांच्या गोमुख, अष्ट भुजा आदि रुप व बाकी विषयांच्या संदर्भात केल्या जाणाऱ्या शंकेच्या संदर्भात ही आगम आज्ञेनुसार विचार केले पाहिजे. विस्तार भयामुळे त्यांना स्थगित करतो.

**पंडितजी :** अरे व्वा ! आपण तर कुशल वादीप्रमाणे प्ररुपणा करीत आहात. आमचे अभिनंदन स्वीकार करा आणि हे सांगा की पद्मावती मातेला निर्वस्त्र करून अर्थात् नेसविलेल्या वस्त्राभरणांना काढून त्यांचे सार्वजनिक रुपात अभिषेकादि करणे कितपत योग्य आहे ?

**जिज्ञासू : (थोडे रागावून)** कोण म्हणतो की त्यांना आधी निर्वस्त्र केले जाते, व त्यानंतर त्यांचे अभिषेक केले जाते ? जो असे म्हणतो, त्याला सत्याचे बोध नाही. प्रतिष्ठेपूर्वी अर्थात् निर्माण काळातच त्यांची मूर्ति दिव्य वस्त्रांनी वेष्टित करून बनविली जाते, ज्यांना काढण्याची कल्पना ही केली जाऊ शकत नाही. त्यामुळे त्यांना निर्वस्त्र करून अभिषेकादि पूजन केले जाते, असे दूषण देणारे

सत्याला किंचित् ही जाणत नाहीत व सत्याला न जाणता न कळतच देव अवर्णवादी होऊन दर्शनमोहनीयाचे आस्रावक बनतात.

**पंडितजी : ( जिज्ञासूच्या स्वाभाविक रागाला पाहून थोडे हसून )** पण हे प्रश्न तर आम्हीच विचारले, तर काय आपण आम्हालाही दर्शनमोहनीयाचे आस्रावक म्हणणार ?

**जिज्ञासू :** नाही, आपणाला नाही, आपण तर आमच्या दृढतेच्या परीक्षणासाठी विचारत आहात, आम्ही तर त्यांच्या साठी म्हणत आहोत, जे खरोखर अशा प्रकारच्या मिथ्या शंका निर्माण करून श्रुत अवर्णवादाला ही कारण बनतात.

**पंडितजी :** बरं, हे सोडा आणि हे सांगा की पुरुष आणि स्त्रियांच्या संबंधांविषयी आपले अनुभव काय आहेत ?

**जिज्ञासू :** एकदम सरळ आहे. ज्या पुरुषाच्या मनात ज्या स्त्री बद्दल आर्यिका, माता, बहिण, मुलगी, वहिणी आदिंचे भाव जागृत होऊन जातात, त्यांच्या बद्दल व्यभिचार अथवा प्रविचाराचे भाव कधीच येत नाहीत. आणि जर आलेच, तर त्यांना विणा शेपटीचे पशू समजले पाहिजे. तसेच स्त्री च्या मनात ज्या पुरुषाबद्दल देवता, मुनि, पिता, भाऊ, पुत्र आदिंचे भाव जागृत होतात, त्याच्या बद्दल स्वप्नातही व्यभिचार वा प्रविचाराचे भाव येत नाहीत. आणि जर आलेच, तर तिला ही विणा शेपटीची पशूच समजावे. याच संदर्भात एक प्रश्न आम्ही आम्हाला पद्मावतीचे अभिषेक करण्यापासून रोकणाऱ्या सज्जनाला विचारले होते की त्या स्त्रिया ज्या वीतरागी भगवंताच्या चरणांना आपल्या हृदयात धारण करून त्यांचे स्तवन व ध्यान करतात, काय त्यांच्यावर पर पुरुषाच्या चरणाला चित्तात धारण करण्याचे व पर पुरुषाचे मनन, स्तवन, ध्यान करण्याचे आरोप लावले जाऊ शकते ? जर नाही, तर का ?



श्री बावनगजाजी चे यक्षराज गोमुख
आणि यक्षणी माँ चक्रेश्वरी

पंडितजी : अति सुन्दर, खूप छान ! बरं, आता हे सांगा की या विषयाचे उपसंहार करताना आपण पाठकांना काय संदेश द्याल ?

जिज्ञासू : नाही, नाही, हे तर आपल्या सारख्या वरिष्ठ जणांनाच शोभादायक म्हटले जाऊ शकते, त्यामुळे जर आपणच काही सांगितले तर उत्तम होईल

पंडितजी : प्रिय पाठकांनो, 20 पंथ आम्नायामध्ये शासन देवी व देवतांच्या अभिषेक–पूजनादिचे अधिकार पुरुष व स्त्री दोघांनाही आहेत. आम्ही कतिपय 13 पंथी मुनिराज व श्रावकांना हात जोडून विनंती करतो की त्यांनी या संभाषणाला गंभीरतेने वाचावे व शंका उत्पन्न झाल्यावर आमच्याशी पत्र व्यवहार करावे. कृपया विषय समजल्याशिवाय आज्ञा प्रधानी 20 पंथींच्या चित्तात त्यांच्या मंद क्षयोपशमाचा फायदा उचलून शंका उत्पन्न करणाऱ्या प्ररुपणा करु नये. आम्हाला फक्त आशाच नाही, तर पूर्ण विश्वास ही आहे की श्री दिगम्बर जैन समाजाचे विद्वत् व नेतृ वर्ग आमच्या या विनंती वर लक्ष देऊन या व यांसारख्या समयोचित कार्याची अनुमोदना नक्कीच करतील.

**।। दर रोज करण्याजोग प्रार्थना ।।**

**पुण्य प्रबल है जिनका उनको प्रभूवर सद्बुद्धि का वर दो।**
**जिनके सद्बुद्धि है उनका पुण्य प्रबल कृपया कर कर दो।।**

**एक ज्वलंत प्रश्न**

आचार्य श्री विद्यासागरजी महाराजांद्वारे कुंण्डलपुरजी (म.प्र.) मध्ये विद्वानांच्या सभेत कानजी मताच्या विरोधात दिलेल्या उपदेशाची एक पुस्तक मुद्रित केली गेलेली आहे 'श्री श्रुताराधनाजी' । या पुस्तकाच्या पान 56 वर आचार्य श्री द्वारे उच्चारित वाक्य लिहला गेला आहे की :

"कोणी स्वीकार करो किंवा न स्वीकारो, परन्तु सुरक्षा व बहुमत तर व्हायलाच पाहिजे."

इथे प्रश्न असा आहे की शासन देवतांच्या साहचर्याचा अभाव करून मानुषां मध्ये धर्म अर्थात् धर्मधारी व धर्मायतनांची सुरक्षा करण्याची सामर्थ्य आहे काय ? शासन देवतांचा अभाव करुन ज्याने बहुमत प्राप्त केला आहे, असा मानुषांचा समुहाला काय सामर्थ्यवान सांगितला जाईल ?

या व असाच अन्य प्रश्नांच्या उत्तरासाठी प्रतिक्षा करा पं. हेमन्त काला द्वारे लिहिलेली पुस्तक "शंकात्मक समालोचना श्री श्रुताराधनाजी वर" । निराशे पासुन बचण्यासाठी आपली प्रत आजच अग्रिम सुरक्षित करा.

– वरिष्ठ संपादक : भरत काला

केल्यावर ही हे ग्रंथराज जन सामान्याचे ग्रंथ बनू शकले नाही, कारण की याच्या पारायणासाठी ज्या स्याद्वाद कौशल्याची गरज भासते, त्याचे सामान्य पाठक व विद्वानांमध्ये अभाव दिसून येते.

निश्चितच ज्यांना वाचण्यासाठी स्याद्वाद कौशल्याची गरज असते, त्याच स्याद्वाद कौशल्याच्या आश्रयाने आचार्य ज्ञानसागरजी महाराजांनी द्विसंधान महाकाव्यादि महान ग्रंथांचे पारायण करून एवढ्या महान ग्रंथांचेच सृजन केले असे नाही, तर त्या स्याद्वाद कौशल्याच्या आश्रय व स्वानुभवाने प्रत्येक जैनाने आपापल्या कुळदेवतांची उपासना केली पाहिजे, असे विधान ही केले असणार.

## श्री जयोदय महाकाव्यजी ला विश्वातील महान ग्रंथ घोषित करणाऱ्या ऐतिहासिक प्रस्तावाची मुद्रित प्रत

(श्री जयोदय महाकाव्यजी ला विश्वातील महानतम् ग्रंथ घोषित करणाऱ्या ऐतिहासिक प्रस्तावाला याठिकाणी श्री जयोदय महाकाव्यजी च्या तृतीय संस्करणातून दिले जात आहे, ज्यावर 54 विद्वानांची हस्ताक्षरे ही आहेत.)

वरिष्ठ संपादक : भरत काला

# बृहत्-चतुष्टयी

(ऐतिहासिक प्रस्ताव पास)

जयोदय महाकाव्य राष्ट्रीय विद्वत्संगोष्टी (दिनांक 29.09.1995 ते 03.10.1995) मदनगंज–किशनगड मध्ये देशातील विविध भागांतून आलेले आम्ही सर्व साहित्याध्येता महाकाव्याच्या अनुशीलनाच्या निष्कर्षांवर सामूहिक काव्यशास्त्रीय विचारानन्तर वाणीभूषण महाकवि भूरामल शास्त्री यांद्वारे प्रणीत जयोदय महाकाव्याला संस्कृत साहित्येतिहासात बृहत्त्रयी संज्ञा प्राप्त महाकाव्यांसोबत जयोदय महाकाव्याला सम्मिलित करून बृहत्–चतुष्टयी च्या अभिधानाने संबोधित करीत आहोत.

विद्वज्जगताला आमची आग्रहपूर्वक विनंती आहे की ते ही वरील चारही महाकाव्यांना बृहत्–चतुष्टयी संज्ञेने अभिहित करतील.

1. डॉ. प्रेमसुमन जैन, उदयपूर, 2. डॉ. नलिन के शास्त्री, बोधगया, 3. डॉ. अजितकुमार जैन, आगरा, 4. डॉ. अशोक कुमार जैन, लाडनू, 5. डॉ. फूलचन्द जैन, वाराणसी, 6. सुरेशचन्द जैन, वाराणसी, 7. डॉ. दयाचन्द साहित्याचार्य, सागर, 8. पं. अमृतलाल शास्त्री, दमोह, 9. श्रीमति चमेली देवी, भोपाल, 10. डॉ. (कु) आराधना जैन, बासौदा, 11 डॉ. मुन्नीदेवी जैन, वाराणसी, 12 डॉ. मनोरमा जैन, 13 डॉ. ज्योति जैन, खतौली, 14 डॉ. उर्मिला जैन, बडौत, 15. डॉ. सुधा जैन, लाडनू, 16. डॉ. नरेन्द्र कुमार जैन, सनावद, 17. डॉ. सुरेन्द्रकुमार जैन, बुरहानपूर, 18. डॉ. ओमप्रकाश जैन, किशनगड, 19. डॉ. सरोज जैन, बीना, 21. डॉ. प्रेमचन्द

# पर्युषण महापर्वाचे वर्तमान रूप सादि आहे की अनादि ?

(पान क्र. 8 वर बाकी राहिलेल्या महत्वपूर्ण प्रश्नावर चर्चा)

जिज्ञासु : तुम्ही सांगितले की पूर्वी लोक नवरात्री पर्वाला व्रताच्या रुपात व्यक्तिगत रुपात च साजरे करायचे, परन्तु कालांतराने अन्यमतिंचे जैनांवर वाढते कुप्रभाव पाहून, त्यावर अंकुश लावण्याच्या उद्देश्याने आचार्य महावीरकीर्तिजी महाराजांच्या शिष्य वर्गाद्वारे नवरात्रीला सार्वजनिकतेचे रुप देऊन विकसित केले गेले, तर काय पर्वांना अशा प्रकारे विकसित करण्याचे अजून ही प्रमाण आपल्याजवळ आहेत ?

पंडितजी : याविषयी सर्वोत्तम उदाहरण म्हणजे भाद्रपद महिन्यातील पर्युषण महापर्व. वर्तमान काळात भाद्रपद महिन्यातील पर्युषण पर्वाने ज्याप्रकारे जैनांच्या मुख्यातिमुख्य पर्वाचे आकार घेतले आहे, त्याप्रकारे याला साजरे करणे व करविण्याचे उपदेश जिनेन्द्र भगवंता द्वारे निर्देशित चार अनुयोगांपैकी एकाही अनुयोगात नाही, हो, नवरात्री व्रता प्रमाणे वर्षातून तीन वेळा केल्या जाणाऱ्या व्रताच्या रुपात याचे उल्लेख अवश्य मिळते.

भाद्रपद महिन्यातील त्याच तिथिंना साजरे केल्या जाणाऱ्या गणेशोत्सवाला जेव्हा लोकमान्य टिळका द्वारे आमोखास सर्वांनाच आकर्षित करणारे सार्वजनिक रुप दिले गेले, तेव्हा त्याच्या या सार्वजनिक रुपाकडे आकर्षित होऊन जैन बांधव ही त्या उत्सवांमध्ये सामिल होऊ लागले, बहुतेक त्याला पाहूनच कोणा विद्वान जैनी द्वारे या पर्वाला (पर्युषण) सार्वजनिक रुपात साजरे करण्याची सुरुवात केली गेली असणार, अन्यथा हा मोठा आश्चर्य उत्पन्न करणारा प्रश्न आहे की ज्याला एवढ्या उत्साहाने साजरे करण्याचे चार अनुयोगांपैकी एकाही अनुयोगात उल्लेख नाही, ते सहसा जैनांचे एवढे महत्वपूर्ण उत्सव कसे झाले ?

आज ही त्या बुद्धिमान व्यक्तिच्या दिलेल्या संस्कारांमुळेच गणेशोत्सवाचे सांस्कृतिक कार्यक्रम व भव्यता जैनांना आकर्षित करू शकत नाही, व ते आपल्या इथल्या सांस्कृतिक कार्यक्रम व भव्यतेमध्ये रमतात.



प्रकाशक : हेमन्त काला (अधिष्ठाता : श्री भारतवर्षीय दिगमबर जैन श्रुत पुत्र पीठ)
438, चंद्रिका, कालानी नगर, विमान पत्तन मार्ग, इन्दौर (म.प्र.)
पहिली आवृत्ती/11000 प्रती/किंमत : 10 रुपये फक्त/प्रकाशन वर्ष ऑक्टोबर 2008 विजया दशमी
मुद्रक : अथर्व पेकेजिंग प्रा. लिमिटेड, 32, सेक्टर ए, इन्डस्ट्रीयल एरिया, सांवेर रोड, इन्दौर (म.प्र.)
या पुस्तकाशी संबंधित सर्व विवादांसाठी न्यायालयीन क्षेत्र इन्दौर (म.प्र.) राहील.